# धर्मपद

अथवा

# गौतम बुद्धाचीं सामान्य नीतितत्त्वें.

लेखक

बळवंत त्र्यंबक द्रवीड.

सन १९०३

किंमत ४ आणे.

( विद्याविनोदांतून प्रसिद्ध झालेलें )



# धर्मपद

अथवा

# गौतम बुद्धाचीं सामान्य नीतितत्त्वें.

लेखक

## बळवंत त्र्यंबक द्रवीड.

पुणें येथें

रावजी श्रीधर गोंधळेकर यांचे जगद्धितेच्छु
छापखान्यांत छापिलें.



सन १९०३

किंमत ४ आणे.

# अनुक्रमणिका.




| | | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | युग्म | १ |
| २ | दक्षता | ४ |
| ३ | मन | ६ |
| ४ | पुष्पें | ७ |
| ५ | मूर्ख | ९ |
| ६ | विद्वान ( पंडित ) | ११ |
| ७ | पूज्य ( अर्हत् ) | १२ |
| ८ | सहस्र | १३ |
| ९ | अधर्म | १५ |
| १० | शिक्षा | १७ |
| ११ | जरा | १९ |
| १२ | स्वतः | २० |
| १३ | लोक | २२ |
| १४ | बुद्ध | २३ |
| १५ | सुख | २५ |
| १६ | प्रिय | २७ |
| १७ | राग | २८ |

१८ मल .... .... ... .... .... .... .... ३०
१९ धर्मार्थ .... .... .... .... .... .... .... ३२
२० मार्ग ... .... ... .... .... .... .... ३४
२१ नानाविषय .... ... ... ... .... .... ३६
२२ निरय ( अधोगति ) .... .... .... ... .... ३९
२३ नाग ( हत्ती ) .... .... .... .... .... .... ४०
२४ तृष्णा .... .... .... .... .... .... .... ४२
२५ भिक्षु .... .... .... .... .... .... .... ४६
२६ ब्राह्मण .... .... .... .... .... .... .... ४९

# प्रस्तावना.



प्रस्तुत ग्रंथासंबंधानें माहिती देत बसण्यापूर्वी आज जगाच्या पाठीवरील एक तृतीयांश लोकांत प्रचलित असलेल्या व पूर्वी एकवार तर याहून फारच अधिक विस्तार पावलेल्या बुद्धधर्माचा प्रवर्तक जो प्रसिद्ध गौतमबुद्ध त्याचें स्वरूप चरित्र वाचकांच्या पुढें ठेविलें असतां या ग्रंथाचें स्वरूप वाचकांच्या विशेषरीतीनें लक्षांत येऊन हा ग्रंथ कशा प्रसंगीं व कोणत्या कार्यसिद्धीसाठीं निर्माण झाला याची माहितीही वाचकांना त्यांतच मिळणार आहे.

काशीच्या ईशान्येस सुमारें शंभर मैलांवर पूर्वी कपिलवस्तु नांवाचें एक मोठें शहर होतें. तेथें शाक्य नांवाच्या सूर्यवंशाशीं संबंध असलेल्या कुळांतील शुद्धोदन नामक राजा राज्य करीत होता. हा मोठा शूर व न्यायी असून आपल्या प्रजेचें मुलांप्रमाणें पालन करीत असल्यानें याच्या प्रजेचें यावर फार प्रेम असे. कोलियनाच्या अंजन राजानें आपल्या मायादेवी व महाप्रजापती नांवाच्या दोन मुली या शुद्धोदनाला दिल्या. या दोघींच्याही पोटीं बरेच दिवस मूल नसल्यानें राजा मोठ्या चिंतेंत होता. शेवटीं मायादेवीला तिच्या वयाच्या पंचेचाळीसाव्या वर्षी गर्भ राहून बाळंतपणासाठीं ती माहेराला जात असतां वाटेंतच एका रमणीय राईमध्येंच ती प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें. या योगानें राजाला आनंद होऊन या मुलाच्या योगानें राजाचा हेतु सिद्धीस गेल्यानें त्याचे जातकर्मादि संस्कार करून सिद्धार्थ असें त्याचें अन्वर्थक नांव ठेविलें. हाच पुढें प्रसिद्ध बौद्धधर्म प्रवर्तक गौत्तम बुद्ध या नांवानें लोकांत प्रसिद्धीस आला. याचा जन्म इ० सनापूर्वी ५५७ त झाला असें पुष्कळ मानतात.

बापानें याच्या शिक्षणाची योग्य तजवीज केली, व हाही मोठा तैलबुद्धीचा असल्यानें अल्पवयांतच त्यानें सर्व विद्या ग्रहण केल्या. वेद व उपनिषदें यांचें ज्ञानही त्याला लहानपणींच चांगलें झालें होतें. लहापणापासून याला खे-

ळ वगैरे आवडत नसून नेहमीं आपल्या भोंवतालच्या गोष्टींचें सूक्ष्म निरीक्षण करून एकांतामध्यें वैराग्य वृत्तीनें त्यावर विचार करीत राहणें त्याला मनापासून आवडे. त्याची ती वृत्ति पाहून बापाला मोठी काळजी पडून त्याचें लक्ष तेथून काढून ऐहिक विषयांकडे लावण्यासाठीं कोली देशच्या सुप्रबुद्ध नांवाच्या राजाच्या यशोधरा नामक लावण्यवती मुलीशीं त्याचें लग्न लावून देऊन आपल्या राजधानीच्या जवळच एका उपवनांत एक रम्य मंदिर बांधून तेथें त्यानें त्या दोघांना ठेविलें, व मुलाच्या उपभोगासाठीं तेथें सर्व भोग्य वस्तू तयार राखण्याची व्यवस्था ठेविली. सिद्धार्थ याप्रमाणें तेथें आपल्या प्रियेच्या समागमांत राहिला असतां मधून मधून जेव्हां तो पित्याच्या आज्ञेनें नगरांत फिरण्याकरितां निघे, तेव्हां जरा, मृत्यु, रोग इत्यादि नानादुःखांनीं पीडलेले लोक पाहून त्याचें अंतःकरण कळवळे व ह्या जगाची नश्वरता अधिकाधिक त्याच्या लक्षांत येत जाऊन त्याचें औदासिन्य अधिकाधिकच वाढत चाललें व त्याच्या मनाची तळमळ फार वाढत चालली. संसाराविषयीं त्याला अगदीं वीट येऊन तो घर सोडण्याचा विचार करूं लागला. याच सुमारास त्याला राहुल नांवाचा एक मुलगा झाला.

याप्रमाणें संसाराला कंटाळलेला असा तो एकेदिवशीं जांभळीच्या झाडाखालीं संसारदुःखाविषयीं विचार करीत बसला असतां त्याची एका यतीशीं गांठ पडली, व त्या भेटींत त्या यतीनें संसारदुःखाचें चित्र त्याच्या मनावर पूर्ण बिंबवून एका सत्यज्ञानावांचून दुसऱ्या कशांत पूर्ण आनंद नाहीं ह्मणून सांगितलें. त्यावरून धर्माचरणाला अमुकच विवक्षित काल नाहीं, असा विचार करून यतिवेष घेऊन सत्यज्ञानासाठीं तो वनांत फिरत राहून महंतांची गांठ घेऊन त्यांपासून ज्ञान मिळवून घेण्याचा त्यानें मनाचा पक्का निश्चय केला.

याप्रमाणें सर्व संग सोडून यतिवेषानें वनांत फिरत राहण्याचा मनाचा निर्धार केल्यावर कोणाचा आपल्याला अडथळा येऊं नये ह्मणून मध्यरात्रीच्या वेळीं सर्व निजले असतां घरांतून बाहेर पडण्याचें त्यानें ठरविलें आणि आपल्याला प्रिय पत्नीचें व मुलाचें शेवटचें मुखावलोकन करून बाहेर पडावें ह्या उद्देशानें तो आपल्या प्रियेच्या महालाकडे गेला. तेथें त्यांना गाढ झोंप लागलेली पाहून आपल्या प्रियेला उठविलें असतां आपल्या बेताला तिच्याकडून

अडथळा येईलसें वाटून डोळ्यांतून अश्रु ढाळीत त्यांच्या तोंडाकडे टकमक पहात उचंबळ खाणाऱ्या प्रेमादि विकारांना धैर्यानें दाबून तो तडक राजवाड्यांतून बाहेर पडला, व आपला विश्वासांतला सारथि जो छंद त्याकडून घोडा तयार करवून त्याबरोबर त्यानें थेट वनाची वाट सुधारली. वनांत गेल्यावर त्यानें छंदाला चार उपदेशपर समाधानीच्या गोष्टी सांगून घोड्यासकट नगराला परत पाठवून दिलें, व स्वतः एकटा पायीं मुनींचे आश्रम शोधीत वनांतून फिरत राहिला. वाटेंत एक पारधी भगवीं वस्त्रें ल्यालेला त्याला भेटला. त्याला भगवीं वस्त्रें अंगावर घेण्याचें कारण त्यानें विचारलें. तेव्हां 'या वेषांत शिकारी जनावरांना फसवून शिकार चांगली हातीं लागते,' ह्मणून तो पारधी ह्मणाला. तेव्हां आपलीं मौल्यवान वस्त्रें त्याला देऊन त्याचीं तीं भगवीं वस्त्रें अंगावर घेऊन सिद्धार्थ पुढें निघाला. शुद्धोदनराजाला छंदापासून सिद्धार्थाची सर्व हकीकत कळली असतां त्यानें कुलगुरु व मंत्री यांना त्याची समजूत घालून त्याला परत आणण्यासाठीं भार्गवाश्रमाला पाठविलें. परंतु सिद्धार्थ दृढनिश्चयानेंच घराबाहेर पडला असल्यामुळें जगाचा नश्वरपणा व तपादि साधनांनीं सत्यज्ञान प्राप्त करून घेण्याचा आपला दृढनिश्चय त्यांना कळवून त्यांना परतवून तपस्व्यांचे आश्रम पहात तो पुढें चालला. भार्गव आश्रमांतील तपस्वी लोकांना स्वर्गेच्छेनें देहदंडनमूलक निरनिराळ्या व्रतनियमादिकांमध्यें गढलेले पाहून ज्यापासून फार झालें तर नश्वर असें स्वर्गसुखच मिळावयाचें त्या दुःखमूलक तपामध्यें कांहीं अर्थ नसून सत्यज्ञानानें ह्या पुनर्जन्माच्या फेऱ्यांतूनच सुटणें अधिक चांगलें, असें त्याच्या मनानें घेतलें, व त्यांच्या सांगण्यावरून विंध्यकोष्ठ येथें कोणी सांख्यमतानुयायी अराड नांवाचे मुनी रहात होते त्यांचेपासून तत्त्वज्ञान करून घेण्यासाठीं तो त्यांचेकडे निघाला. वाटेंत राजगृह नगरीच्या बिंबसार राजानें मुनिवृत्तीपासून त्याचे मन फिरविण्याचा नानाप्रकारें यत्न केला; पण विषयसुखाची असारता व वैराग्यामध्येंच मिळणारें खरें सुख त्या राजाच्या मनावर बिंबवून तो पुढें अराड मुनींकडे गेला. त्यांची गांठ घेऊन त्यांच्यापासून सांख्यमताप्रमाणें संसाराचें स्वरूप व अविनाशी पद मिळविण्याचा उपाय हीं त्यानें ऐकून घेतलीं; पण त्यापासून त्याचें समाधान मुळीं झालें नाहीं. पुढें त्यानें उद्रक मुनींची गांठ घेतली; पण त्यांपासूनही त्याचें समाधान झालें नाहीं. पुढें तो ग-

यराजर्षीच्या नगरी नामक आश्रमाला गेला. तेथील ऋषींच्या तोंडून त्याला असें कळलें कीं, ज्ञानानें ब्रह्मप्राप्ति होण्याला शास्त्रांत सांगितलेलीं कर्मेंच अवश्य आहेत. कर्मांनीं सर्व वृत्तींवर जय मिळून मनुष्य कर्मातीत होऊन मुक्त होतो, व ब्रह्माशीं मिळून जातो. तेव्हां तसें कदाचित् असण्याचा संभव आहेसें वाटून सहा वर्षें उपवास करून व्रतनियमादिकांनीं त्यानें आपलें शरीर अगदीं सुकवून घेतलें; व त्याचें केवळ अस्थिचर्म उरलें. तरी त्याच्या डोळ्यापुढें त्याला हवें होतें तें कांहींच दिसेना. तेव्हां त्याला वाटलें कीं, या देहदंडनात्मक तपश्चर्येंत कांहीं अर्थ नाहीं. कारण भूक, तहान, श्रम इत्यादिकांनीं मनाला व्यग्रता मात्र येते, व विचार करून विवेक करण्याला तें अपात्र होतें. इंद्रियतृप्तीनेंच मन एकाग्र राहून कोणत्याही गोष्टीकडे लागतें.असा विचार करून त्यानें फिरून शक्ति मिळविण्याचा बेत केला.परंतु बसल्या जागेवरून उठण्याचें सुद्धां त्याला सामर्थ्य राहिलें नव्हतें. इतक्यांत एक मुलगी त्या ठिकाणीं आली होती तिनें त्याला थोडें दूध प्यावयास आणून दिलें. त्यानें तकवा येऊन तो पुढें निघाला, व यापुढें खाण्यापिण्यासंबंधानें त्यानें कांहीं निर्बंध ठेवला नाहीं. अशा स्थितींत तो एकदां बराच वेळ ध्यान लावून बसला; पण त्यांतून उठला असतां त्याला एकाएकीं ग्लानि येऊन तो पडला. त्याला तेथें उन्हांत तळपतांना पाहून तेथें जवळच असलेल्या एका धनगराच्या मुलानें झाडाच्या फांद्या तोडून त्याच्यावर छाया केली व तो कोणी उच्च वर्णाचा असावासें वाटून लांबूनच एका बकरीचें आचळ पिळून त्याच्या तोंडांत तो दुधाची धार पाडूं लागला. त्यानें बोधिसत्त्वाचें ( सिद्धार्थाचें ) समाधान झालें नाहीं. तेव्हां त्यानें त्या मुलाजवळ दुधानें भरलेला तांब्या होता तो मागितला. तेव्हां 'मी शूद्र असल्यामुळें ह्या भांड्याला शिवल्यानें आपल्याला विटाळ होईल,' असें तो मुलगा ह्मणाला. हें त्या मुलाचें भाषण ऐकून बोधिसत्त्व ह्मणाला कीं, 'आपण सर्व या जगांत सारखे असून एकमेकांची एकमेकांना गरज लागते, व एकमेकांसंबंधानें भूतदया वाटते. आपल्या सर्वांच्या रक्तामध्यें कांहीं भेद नसून उच्च वर्णाचा मनुष्य आपल्या उच्च वर्णाच्या चिन्हांनीं कांहीं जन्माला येत नाहीं; जो सदाचारानें वागतो तो जन्मतः कोणीही असला तरी उच्च वर्णाचा असून दुराचाऱ्याचा उच्च वर्णांत जन्म असला तरी त्याला नीचच

समजलें पाहिजे.' असें ह्मणून तो त्याच्या लोटींतलें दूध प्याला. असो. पुढें तो एकटा एका पिंपळाच्या झाडाखालीं नेहमीं मनन करीत बसत असे. तेथें एके वेळीं एका स्त्रीचें गायन त्याच्या कानावर पडलें. त्याचा आशय असा होता कीं, ' सतार फार उंच अगर फार बारीक न लावतां मध्यम लावावी ह्मणजे ती चांगला आवाज देते. ती फार ताणल्यानें तुटण्याची भीति असून फार ढिली ठेवल्यानें नाद मिळत नाहीं. ' यापासून घ्यावयाचा तो बोध घेऊन या पुढें तपश्चर्येनें देह उगीच न सुकवितां साधारण रीतीनें राहण्याचा त्यानें कायम निश्चय केला. याप्रमाणें धर्मरहस्य कळण्याला मनाची सुस्थिति व मनाच्या सुस्थितीला देहाची सुस्थिति अत्यावश्यक आहे, अशी त्याची खातरी होऊन त्याप्रमाणें वर्तन ठेवून एकांतामध्यें पिंपळाच्या झाडाखालीं तो संसारदुःखाच्या कारणासंबंधानें उत्कटमनानें विचार करीत बसला असतां त्याच्या मनावर लख्खकन् प्रकाश पडून त्याची तळमळ गेली, व मन शांत झालें. या वेळेपासून याला बुद्ध ( जागा झालेला ) हें नांव मिळून ज्या वृक्षाखालीं त्याला हा बोध झाला त्याला बोधिद्रुम हें नांव पडलें. याचा अवशेष अद्यापि बुद्धगया येथें आहे. याप्रमाणें त्याच्या मनावर प्रकाश पडला असतां ईश्वर किंवा आत्मा ह्मणून वेगळा कोणी नसून, संसारदुःखाला कारण मनुष्याचीं कर्मं आहेत असें त्याचें ठाम मत झालें. कारण वासनामूलक जीं बरीं वाईट कर्मं मनुष्याच्या हातून घडतात त्यांचे संस्कार कायम राहून त्यांचीं फलें भोगल्यावांचून सुटका होत नाहीं व तीं भोगण्यासाठीं फिरून फिरून जन्म घ्यावे लागून मनुष्याला या संसृतीच्या फेऱ्यांत पडावें लागतें; तेव्हां हा चुकवून निर्वाण ( सर्व सुखदुःखाभाव ) मिळण्याला वासनांचा बीमोड करून इंद्रियनिग्रहपूर्वक सर्व भूतमात्रांसंबंधानें मनांत दया व समदृष्टि ठेवून निष्कामपणें परोपकाराचीं कृत्यें करीत राहणें हाच एक उपाय आहे असें वाटून, सर्व जनसमूहाच्या मनावर उपदेशानें हें तत्त्व ठसवून त्यांना नीतिमार्गाकडे लावण्याकडे आपलें अवशिष्ट आयुष्य वेंचावयाचें, असा त्यानें निश्चय केला. जडगुण, वेदना, सज्ञा, संस्कार व विज्ञान या पांच स्कंधांचा मनुष्य बनला आहे व आत्मा वगैरे सब झूट आहे असें त्याचें मत झालें, व वेदालाही तो मानीनासा झाला.

हें बुद्धानें काढलेलें तत्त्व नवीन नसून उपनिषदादि ज्ञानमार्गाक-

डे लावणाऱ्या अनेक ग्रंथांतील कांहीं सामान्य तत्त्वांचीच ही पुनरुक्ति होती, असें कोणाही मार्मिक वाचकाच्या लक्षांत येणार आहे. त्यानें नवीन जें काय केलें तें हें कीं, इतस्ततः अव्यवस्थित रीतीनें पसरून राहिलेल्या नीतितत्त्वांना व्यवस्थितपणा आणून त्यांपैकीं कांहींचें स्वरूप पूर्वीपेक्षां किंचित् उजळ केलें. तर मग या धर्माचा–अगर या मताचा ह्मटलें तरी चालेल–इतका झपाट्यानें प्रसार कसा झाला ह्मणून साहजिक प्रश्न उद्भवतो; तर त्यावेळची परिस्थिति, भेदभाव न ठेवतां वाटेल त्याला आपल्या पंथांत घेण्याची सवड व ' बोले तैसा चाले, ' याप्रमाणें उपदेशानुरूप बुद्धाच्या अंगचें चोख नीतीचें वर्तन हींच मुख्यतः त्याला कारणीभूत झालीं.

या वेळची परिस्थितिच अशी होती कीं, कोणत्याही नवीन पंथाला पुष्कळ अनुयायी मिळणें अगदीं सहज–एवढेंच नव्हे तर स्वाभाविक–होतें. इसवी सनापूर्वी सहाव्या शतकाच्या सुमारास सनातन आर्य धर्माचें उज्ज्वल स्वरूप जात चाललें असून वृथा कर्मकांडाचें बंड माजून पुरोहित वर्गाचें [ ब्राह्मणांचें ] प्रस्थ फारच माजत चाललें होतें. शूद्रादि हलक्या जातींना बऱ्याच धर्मकृत्यांमध्यें मज्जाव झाला असून त्यांची स्थिति फारच शोचनीय झाली होती. तेव्हां योग्य नेता मिळून त्याच्या आश्रयाखालीं आपली स्थिति पालटावी अशी त्यांना उत्कट इच्छा उत्पन्न झाली होती व अशा वेळीं गौतम बुद्धासारखा स्वार्थत्यागी, शुद्ध व चोख आचाराचा मनुष्य आपल्या आचाराचा कित्ता लोकांच्या पुढें ठेवून कोणामध्यें उच्चनीच किंवा स्त्रीपुरुष हा भेदभाव न ठेवतां सर्व जातींच्या सर्व लोकांना आपल्या रसाळ वाणींतून निघणारें उपदेशामृत पाजून निर्वाण प्राप्ति करून देण्याला पुढें आला असतां लोकांचे थवेच्या थवे त्याच्या भोंवतीं गोळा होऊन त्यांनीं त्याचें शिष्यत्व पतकरावें यांत आश्चर्य तें काय? त्याची वाणी फार रसाळ असून व्यवहारांतील सामान्य दृष्टांत देऊन विषय प्रतिपादन करण्याची त्याची शैली इतकी अलौकिक असे कीं, श्रीमान, गरीब, विद्वान, अविद्वान, कोणींही एकवार त्याच्या उपदेशामृताचें प्राशन केलें कीं, लागलेंच तो त्याचें शिष्यत्व पतकरीत असे. अशा रीतीनें लवकरच हजारों शिष्यांचा घोळका त्याच्या भोंवतीं जमला, व कित्येक राजे व मोठे मोठे धनाढ्य सावकार यांनींही त्याचें शिष्यत्व पतकरिलें, व यांनीं याच्या अनुयायांसाठीं मोठ-

मोठीं रम्य वनें व विहार तयार करून दिले. या ठिकाणीं बुद्ध व त्याचे शिष्य बरसातीचे चार महिने काढीत असत, व या अवधींत आपल्या गुरूपासून ज्ञानामृताचा लाभ करून घेऊन त्याचा फायदा त्याचे शिष्य आठ महिने फिरून इतर लोकांना देत व त्यांना आपल्या पंथांत ओढून घेत. सर्वांसंबंधानें अभेद भावाची या पंथांतील लोकांची निश्चयवृत्ति इतकी होती कीं, कोणे एके वेळीं एक गौतम शिष्य वाटेनें चालला असतां त्याला फार तहान लागली. तेव्हां जवळच एका विहिरीवर एक चांडाळाची मुलगी पाणी ओढीत होती. तिजपाशीं त्यानें पाणी मागितलें असतां हा कोणी उच्च जातीचा असून आपण याला पाणी दिल्यानें हा बाटेल या भीतीनें तिनें आपण चांडाळकन्या असल्याचें त्याला कळविलें. तेव्हां बुद्धानें एक वेळीं धनगराच्या मुलीला जशा प्रकारचें उत्तर दिलें होतें तशाच प्रकारचें उत्तर देऊन तो तिच्याजवळचें पाणी घेऊन प्याला. त्यामुळें त्या मुलीच्या मनांत त्याजबद्दल व बौद्धधर्मासंबंधी इतकें प्रेम उत्पन्न झालें कीं, लगेच बुद्धाकडे जाऊन त्याच्यापासून उपदेश घेऊन तिनें तो पंथ स्वीकारला. त्याचप्रमाणें एक वेश्या एकेवेळीं याचे दर्शनाला आली असतां त्याचा उपदेश ऐकून लगेच तिनें त्याचें शिष्यत्व पतकरलें, व त्याच्या सर्व शिष्यांसह त्याला दुसरे दिवशीं आपल्या घरीं भोजनाला बोलावून ती आपल्या घराकडे गेली. इतक्यांत एक राजा त्याच्या दर्शनाला येऊन त्यानें त्याला दुसरे दिवशीं आपल्या सर्व शिष्यांसह भोजनास येण्यास आमंत्रण दिलें. तेव्हां 'त्या वेश्येचें आमंत्रण आधीं घेतलें असल्यामुळें आपल्या आमंत्रणाला मला मान्य होतां येत नाहीं,' असें त्यानें त्या राजाला साफ उत्तर दिलें. एकेवेळीं तुकाराम महाराजांना शिवाजीनें भेटीला बोलाविलें असतां 'आह्मांला तुझी भेट घेऊन तुझ्यापासून काय मिळवावयाचें आहे,' ह्मणून त्यांनीं त्याला साफ उलट निरोप पाठविला व त्यानें पाठविलेलीं रत्नें परत केलीं ह्मणतात. तर त्या व ह्या निःस्पृहतेंत काय अंतर आहे! अशा महात्म्यांना राव व रंक सारखेच असतात. जेव्हां धर्मसूत्रें एखाद्या विवक्षित वर्गाच्या हातीं जातात तेव्हां त्याचीं तत्वें मूळचीं कितीही उज्ज्वळ असलीं तरी कालांतरानें त्यांत स्वार्थपरता घुसून ती त्यांना मलीनता आणीत असते. तेव्हां ती स्थिति दुःसह होऊन त्याला चालन देणारे गौतम बुद्ध, शंकराचार्य, तुकाराम, ल्यूथर,

अशा सारखी मंडळी पुढें येणें स्वाभाविकच आहे.परंतु अशा पुढें येणारांना त्यांच्या कार्यांत पूर्ण सिद्धि येणें हें केवळ त्यांचे उदात्त विचार व त्या बरहुकूम त्यांचा आचार यावरच मुख्यतः अवलंबून असतें. नाहीं तर विचार कितीही उदात्त असले तरी त्यांचा आचाराशीं मेळ नसेल तर अशा विचारांचा लोकांच्या मनावर कांहीं परिणाम घडत नाहीं. गौतम बुद्ध, तुकाराम, ल्यूथर यांना इतक्या अल्पकाळांत आपल्या कामांत इतकें यश मिळून इतके अनुयायी मिळाले या गुढाची गुरुकिल्ली वरील तत्त्वांतच आहे. गरीब श्रीमंत उच्चनीच सारखे लेखून गरिबांची उन्नतिच काय ती त्याच्या डोळ्यापुढें असे. एके वेळीं एका खेड्यांत पटकीचा कहर उसळून लोक हवालदिल झाले असतां याचे दोन तीनशें शिष्य तेथें राहून त्यांना औषधोपचार करून त्यांच्या शुश्रूषेला हजर राहिले. अशा वर्तनाचा सामान्य लोकांच्या मनांवर काय परिणाम झाला असला पाहिजे? एके वेळीं एका ब्राह्मणानें दुरभिमानानें 'ब्राह्मण कोणाला ह्मणावें,' ह्मणून प्रश्न केला असतां बुद्धानें त्याला दिलेलें उत्तर प्रत्येक ब्राह्मणंमन्यानें लक्षांत घेण्यासारखें आहे. तो ह्मणाला, 'आपल्या ठिकाणची पापवासना समूळ नाहींशी करून कोणाचा तिरस्कार न करतां ज्यानें आपलें आचरण शुद्ध ठेवलें आहे व स्वतःवर जय मिळविला आहे, त्यालाच ब्राह्मण ह्मणावें.' व याच तत्त्वाला धरून आपलें आचरण ठेवून तो सर्व सामान्य जनांना नीतीचा उपदेश करीत असे.

पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, त्याचे शिष्य बरसातीचे चार महिने यापाशीं राहून यापासून धर्मतत्त्वें शिकून घेऊन पुढें आठ महिने ते लोकांना त्यांचा उपदेश करीत फिरत, व आपल्या पंथाकडे लोक ओढून घेत. याच्या धर्मांत योग्य विश्वास, योग्य संकल्प, योग्य भाषण, योग्य आचरण, योग्य जीवितक्रम, योग्य प्रयत्न, योग्य विचार व योग्य एकाग्रता, हा धर्माचा आठ प्रकारचा मार्ग सांगितला असून विपत्तीचें अस्तित्व, विपत्तीचें कारण, विपत्तीपासून मुक्ति व ती साधण्यासाठीं वर सांगितलेला अष्टांग मार्ग हीं चार थोर सत्यें सांगितलीं आहेत. बुद्ध आपल्या शिष्यांना जीं धर्मतत्त्वें सांगत असे तीं तेवेळीं कांहीं लिहून ठेवण्यांत येत नसत. त्याचे शिष्य तीं स्मरणांत ठेवून लोकांना उपदेश करीत, व त्यांपैकीं कांहीं भाग स्मरणांतून गेल्यास अगर कांहीं शंका उत्पन्न

झाल्यास गुरूपाशीं येऊन तिचें निरसन करून घेत. हा क्रम बुद्धाच्या हयातीत चालला होता. परंतु तो हें जग सोडून गेल्यावर पुढें तीं तत्त्वें विस्मरणांत पडूं लागलीं. व कालांतरानें तीं नाहींशीं होतील या भीतीनें बुद्धमतानुयायी निरनिराळ्या तीन राजांनीं शंभर शंभर वर्षांच्या अंतरानें सर्व बुद्ध शिष्यांना एकत्र जमवून सर्वांच्या मतानें त्यांचीं मतें कायम करून तीं लिहून ठेवण्याचा प्रयत्न केला. त्यांमध्यें इसवी सनापूर्वी २४२ व्या वर्षी पाटणा येथें अशोकानें भरविलेलें यांचें मंडळ फार मोठें असून फार महत्वाचें होतें. यामध्यें सर्व बुद्धतत्त्वें त्रिपिटकांमध्यें ( तीन पेट्यांमध्यें ) घालून-अर्थात् तीन भागांत संकलित करून लिहून-ठेवण्यांत आलीं. त्यांचीं नांवें विनयपिटक, सूत्रपिटक व अभिधर्मपिटक याप्रमाणें आहेत. पैकीं सूत्रपिटकेंतील बुद्धाच्या तोंडच्या लोकांना केलेल्या नीतीच्या उपदेशापैकीं एका भागाला धर्मपद हें नांव आहे, व तो नीतिबोध कशा प्रकारचा आहे हें धर्मपद वाचल्यानें वाचकांना कळण्यासारखें असल्यामुळें त्यासंबंधानें येथें विशेष लिहिण्याचें कारण नाहीं.

गौतमबुद्धाच्या व त्याच्या त्या वेळच्या शिष्यांच्या शुद्ध आचरणानें राजाश्रयाखालीं त्यांच्या उदात्त नीतितत्त्वांच्या उपदेशाचा लोकांच्या मनांवर इतका चांगला परिणाम झाला कीं, बौद्ध धर्माचा प्रसार उत्तरेला काश्मीर, तिबेट, रशियाचा कांहीं भाग, पूर्वेला ब्रह्मदेश, सयाम, जावा, सुमात्रा, चीन, जपान, दक्षिणेला सिंहलद्वीप व पश्चिमेस एशियामायनर, पालेस्ताईन वगैरे देशांतून कास्पिअन समुद्र येथपर्यंत झाला. बुद्धधर्माच्या व खिस्ती धर्माच्या बहुतेक अंतर्बाह्य साम्यतेवरून बुद्ध धर्म खिस्तीधर्माच्या पूर्वी चार पांच शतकें अस्तित्वांत आला असल्यानें खिस्तीधर्म बौद्धधर्मापासून घेतला असावा, असें अलीकडच्या पुष्कळ विद्वानांचें मत झालें आहे व बौद्धधर्म सनातन आर्य धर्मापासूनच निघाला आहे हें आह्मीं वर सांगितलेंच आहे. यावरून आज जगाच्या पाठीवरील मुख्य मुख्य धर्मांचें जनकत्व सनातन आर्यधर्माकडेसच येतें. असो. याप्रमाणें हा जो इतका फैलावलेला बौद्धधर्म त्याचें त्याच्या जन्मभूमींतूनच इतक्या पूर्णपणें उच्चाटन कसें झालें, हा प्रश्न वाचकांच्या मनांत साहाजिक येणार आहे. त्याचें उत्तर एवढेंच आहे कीं, दुरभिमानी व आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करणाऱ्या ब्राह्मणांच्या दुरभिमा-

नामुळें ज्याप्रमाणें बुद्धमतप्रसाराला मदत झाली, त्याचप्रमाणें बुद्धाचें व त्याच्या त्यावेळच्या शिष्यांचें शुद्धाचाराचें थोर उदाहरण डोळ्यांपुढून गेल्यावर पुढें त्या पंथाच्या उपदेशकांचें वर्तन बिघडल्यामुळें तें त्या धर्माच्या ऱ्हासास कारण होत चाललें. व भट्टपाद वगैरे वैदिक धर्माभिमान्यांनीं त्याचा फायदा घेऊन हिंदुस्थानांतून बौद्ध धर्माचें बहुतेक उच्चाटन केलें व पुढें जगद्गुरु शंकराचार्यांनीं हिंदुस्थानांत ते वेळीं प्रचलित असलेल्या नानापंथांवर आपल्या अलौकिक विद्वत्तेनें जय मिळवून अद्वैत मताचा उज्ज्वळ झेंडा सर्व हिंदुस्थानभर फडकावयाला लाविला.

पुणें तारीख १, आक्टोबर १९०३.

संपादक.

# विद्याविनोद.

वर्ष ५ वें. ता. १ जानेवारी सन १९०३. अंक २ रा


# धर्मपाद.

## पहिला पाद.

### युग्म.

१. ही सर्व सृष्टि आमच्या कल्पनेचा परिणाम असून त्या कल्पनेमुळेंच आहे, व कल्पनात्मक आहे. जर एखादा मनुष्य पापविचार मनांत आणून बोलेल किंवा वागेल तर बैलाच्या पावलांमागें ज्याप्रमाणें चाकोरी जाते, त्याप्रमाणें दुःख त्याच्यामागून असतें.

२. ही सर्व सृष्टि आमच्या कल्पनेचा परिणाम असून त्या कल्पनेमुळें आहे व कल्पनात्मक आहे. जर एखादा मनुष्य शुद्ध विचार मनांत आणून बोलेल किंवा वागेल तर छाया ज्याप्रमाणें त्याला कधीं सोडीत नाहीं, त्याप्रमाणें सुख त्याला धरून असतें.

३. त्यानें मला शिव्या दिल्या, त्यानें मला मारलें, त्यानें माझा पाडाव केला, त्यानें मला लुबाडलें, अशा प्रकारचे विचार जे मनांत आणीत रहातात त्यांच्या मनांतील द्वेषभाव कधीं कमी होत नाहीं.

४. त्यानें मला शिव्या दिल्या, त्यानें मला मारलें, त्यानें माझा

पाडाव केला, त्यानें मला लुबाडलें, अशा प्रकारचे विचार जे मनांत आणीत रहात नाहींत त्यांच्या मनांत द्वेषभावाला जागा रहात नाहीं.

५. कारण द्वेषभाव कधीं द्वेषभावानें बंद पडत नाहीं. द्वेषभाव स्नेहभावानें बंद पडतो हा अगदीं सनातन नियम आहे.

६. आमच्या सर्वांचा शेवट येथें व्हावयाचा आहे हेंच जगाला कळत नाहीं. ज्यांना हें उमगतें त्यांचे तंटे एकदम बंद पडतात.

७. जो इंद्रियांना ताब्यांत न ठेवतां आहारामध्यें अनियमितपणा ठेवून आळशी व दुबळा असा केवळ सुखाकडे लक्ष देऊन रहातो त्याचा, ज्याप्रमाणें वारा एखाद्या किरकोळ झाडाला उमळून पाडतो त्याप्रमाणें, काम खात्रीनें फडशा पाडतो.

८. इंद्रियनिग्रहानें आहार नियमित ठेवून विश्वासानें व दृढ निश्चयानें सुखाकडे लक्ष न देतां जो रहातो त्याच्यापुढें, खडकापुढें ज्याप्रमाणें वाऱ्याचें कांहीं चालत नाहीं त्याप्रमाणें कामाचें कांहीं चालत नाहीं.

९. पाप धुवून न काढतां जो नुसतीं भगवीं वस्त्रें घेऊं इच्छितो व नियमितपणा व सत्य यांकडे लक्ष देत नाहीं तो त्या भगव्या वस्त्रांना पात्र नाहीं.

१०. परंतु ज्यानें सर्व पाप धुवून काढून सर्व सद्गुण अंगामध्यें बाणून घेतले आहेत व नियमितपणा व सत्य अंगांत आणले आहेत, तोच खरोखर भगव्या वस्त्रांना पात्र आहे.

११. ज्यांना असार सारसें वाटून सारामध्यें असार दिसतें, त्यांची मजल सारापर्यंत कधीं जाऊन पोहोंचत नाहीं; परंतु ते मृगजळाप्रमाणें वृथा वासनेच्या मागें लागले असतात.

१२. ज्यांना सारामध्यें सार दिसतें व असारामध्यें असार दिसतें, त्यांची सारापर्यंत मजल पोहोंचून खऱ्या मार्गाकडे ते लागले असतात.

१३. चंद्रमौळी घरामधून ज्याप्रमाणें पावसाचा शिरकाव होतो, त्याप्रमाणें अविचारी मनामधून विकारांचा शिरकाव होतो.

१४. ज्याप्रमाणें चांगल्या शाकारलेल्या घरामधून पावसाचा शिरकाव होत नाहीं, त्याप्रमाणें विचारी मनामधून विकारांचा शिरकाव होत नाहीं.

१५. दुष्कर्म करणारांना ह्या लोकीं त्याचप्रमाणें परलोकीं रडत बसावें लागतें. आपल्या दुष्कर्मांचे दुष्परिणाम सोसावे लागले ह्मणजे त्यांभा वाईट वाटून दुःख होतें.

१६. सत्कर्मानें वागणारा या लोकीं त्याचप्रमाणें परलोकीं अशा दोन्ही लोकीं आनंदांत रहातो. आपल्या कर्माचें शुद्ध फल मिळालेलें जेव्हां त्याच्या दृष्टीस पडतें तेव्हां त्याला मोठा आनंद होतो.

१७. दुष्कर्म करणारा इहपर अशा दोन्ही लोकीं दुःख भोगतो. आपण केलेल्या दुष्कर्माबद्दल जेव्हां तो विचार करतो, तेव्हां त्याला दुःख होतें. व त्याच दुष्ट मार्गानें फिरून जाऊं लागला ह्मणजे त्याला अधिकाधिक दुःख होतें.

१८. सद्गुणी मनुष्य इहपर अशा दोन्ही लोकीं सुखी असतो, आपण केलेल्या सत्कर्माचा विचार केल्यानें त्याला सुख होतें व त्याच मार्गानें पुढें चालत असतां त्याला विशेष सुख होतें.

१९. अविचारी मनुष्याला संहितेचा पुष्कळ भाग तोंडपाठ असला तरी त्याप्रमाणें तो वागत नसेल तर तो श्रमण ( उपदेशक ) होण्याला पात्र नाहीं. दुसऱ्याचीं गुरें राखीत बसणाऱ्या गुराख्याप्रमाणें त्याला समजावें.

२०. परंतु संहितेचा थोडा भाग जरी त्याला तोंडपाठ येत असला तरी राग, द्वेष व मौर्ख्य सोडून सत्यज्ञान व मनाची शांति हे गुण जर तो मनांत वागवीत असेल, व ह्या जगांतील व परलोकीच्या

करतो तेव्हां ज्ञानाच्या उच्च शिखराला पोहोंचून दुःखापासून मुक्त होऊन पर्वतावर उभा असलेला मनुष्य खालच्या मैदानांतील मनुष्याकडे ज्याप्रमाणें पहातो, त्याप्रमाणें दुःखांत पडलेल्या मूर्ख जनसमुदायाकडे तो पहात रहातो.

२९. अविचारी लोकांमध्यें दक्ष व निजलेल्यांमध्यें जागा असा राहून विद्वान मनुष्य भाडोती तट्टाला मागें सारणाऱ्या शर्यतीच्या घोड्याप्रमाणें पुढें सरसावतो.

३०. दक्षतेनेंच इंद्राला देवांचें स्वामित्व मिळालें, लोक नेहमीं दक्षतेची वहावा करून अविचाराला दोष देतात.

३१. जो भिक्षु दक्षतेमध्यें आनंद मानून अविचाराला वचकून असतो तो अग्नीप्रमाणें सर्व लहान मोठे बंध तडातड तोडीत रहातो.

३२. जो भिक्षु विचारामध्यें आनंद मानतो व अविचारासंबंधानें भिऊन असतो, त्याला आपल्या पूर्णावस्थेपासून भ्रष्ट होण्याची भीति नसते. तो निर्वाणाच्या अगदीं जवळ जाऊन पोहोंचला असतो.

---

# तिसरा पाद.

## मन.

३३. ज्याप्रमाणें तिरंदाज आपला तीर सावरतो, त्याप्रमाणें शहाण्या मनुष्यानें ज्यावर लक्ष पुरवितां येणें व त्याला आवरतां येणें फार कठीण आहे अशा चंचल व अस्थिर मनाला नीट आवरावें.

३४. पाण्यांतून काढून बाहेर टाकलेल्या माशाप्रमाणें आपलें मन वासनेच्या तडाक्यांतून सुटण्यासाठीं चोहोंकडे भटकत असतें.

३५. जें चंचळ असून आवरतां येणें फार कठीण आहे व वाटेल तेथें भटकत असतें अशा मनाला स्वाधीन ठेवणें चांगलें. मन स्वाधीन असेल तर त्यापासून सुख होतें.

कोणत्याही गोष्टीबद्दल तो जर पर्वा करीत नसेल तर तो श्रमण (उपदेशक) होण्याला पात्र) आहे.

---

## दुसरा पाद.

### दक्षता.

२१ दक्षता ही निर्वाणाची वाट असून अविचार मृत्यूकडे पोहोंचविणारी वाट आहे. जे दक्ष आहेत ते कधीं मरत नाहींत. अविचारी मेल्यासारखेच आहेत.

२२. हें स्पष्ट लक्षांत घेऊन ज्यांनीं दक्षतेमध्यें बरीच गति केली आहे त्यांना त्यांत आनंद वाटून आर्यांच्या खऱ्या ज्ञानामध्यें त्यांना सुख होतें.

२३. या विचारशील, निश्चित व न ढळणारे गुण अंगांत बाणणाऱ्या विद्वानांना श्रेष्ठ सुख जें निर्वाण तें मिळतें.

२४. जर दक्ष मनुष्य विस्मृति बाजूला ठेवून जागा होईल, जर त्याचीं कर्में शुद्ध असतील, जर तो विचारानें वागेल व आत्मनिग्रह ठेवून शास्त्राला सोडून चालणार नाहीं तर त्याचें वैभव वाढेल.

२५. जागृतीनें, दक्षतेनें व आत्मनिग्रहानें शहाण्या मनुष्याला स्वतःसाठीं ज्या ठिकाणीं महापुराचें कांहीं चालणार नाहीं असें द्वीप तयार करून घेतां येतें.

२६. अविद्वान असे मूर्ख वृथाभिमानाच्या मागें लागतात. विद्वान मनुष्य दक्षतेला उत्तम रत्न समजून पोटाशीं बाळगतो.

२३. वृथाभिमान राग, लोभ यांच्या मागें लागूं नकोस. जो दक्ष व विचारी आहे त्याला पुष्कळ सुख मिळतें.

२८. जेव्हां विद्वान मनुष्य दक्षतेनें वृथाभिमानाला दूर

३६. शहाण्या मनुष्यानें आपल्या विचारावर लक्ष पुरवावें. कारण ते फार वस्ताद असून आपल्याला दिसत नाहींत व वाटेल तेथें भटकत असतात. विचारावर योग्य लक्ष दिल्यानें त्यापासून मनुष्याला सुख होतें.

३७. वाटेल तेथें एकटें भटकणाऱ्या व हृत्कोशामध्यें दडून बसलेल्या अनंग अशा मनाला ज्यांना दाबांत ठेवतां येतें ते वासनेच्या पाशापासून सुटतात.

३८. मनुष्याचा विश्वास डळमळीत असून त्याला खरा धर्म न कळतां त्याच्या मनाची शांति जर बिघडेल तर तें त्याचें ज्ञान कधींही पूर्ण समजतां येणार नाहीं.

३९. मनुष्याचे विचार अस्ताव्यस्त व गोंधळलेले नसून जर बऱ्या वाइटाचा विचार करणेंच तो सोडून देईल तर तो हुशारीनें असेपर्यंत त्याला कशाचीही भीति नाहीं.

४०. हा देह मडक्याप्रमाणें क्षणभंगुर आहे ही गोष्ट लक्षांत ठेवून आपले विचार किल्याप्रमाणें मजबूत करून मनुष्यानें ज्ञानरूपी आयुधाच्या साह्यानें कामावर उठावें व त्याला जिंकल्यावरही स्वस्थ न रहातां त्यावर नजर ठेवावी.

४१. अरेरे, बुद्धीवांचून हा देह निरुपयोगी ओंडक्याप्रमाणें तुच्छ होऊन पृथ्वीवर पडणार आहे.

४२. वैरी वैऱ्याचें अथवा शत्रु शत्रूचें जें कांहीं नुकसान करील त्याहून जास्ती नुकसान आड वाटेला लागलेलें मन करतें.

४३. सरळ वाटेला लागलेल्या मनाच्या योगानें जें आपलें कल्याण होतें तेवढें कल्याण आईच्या, बापाच्या किंवा दुसऱ्या कोणाही आप्ताच्या हातून होत नाहीं.

# चवथा पाद

## पुष्पें,

४४. ही पृथ्वी, त्याचप्रमाणें यमलोक व देवलोक कोण जिंकील? हुषार मनुष्य पाहिजे असलेलें फूल ज्याप्रमाणें अचूक निवडून काढतो त्याप्रमाणें सद्गुणाचा मार्ग शोधून काढण्याचें सामर्थ्य को[illegible] अंगीं आहे?

४५. सच्छिष्य या पृथ्वीला, यमलोकाला व देवलोकाला जिंकून, हुषार मनुष्य ज्याप्रमाणें हवें असलेलें फूल नेमकें शोधून काढतो, त्याप्रमाणें स्पष्ट रीतीनें दाखवून दिलेला सद्गुणाचा मार्ग नेमका शोधून काढतो.

४६. जो हें शरीर फेंसाप्रमाणें क्षणभंगुर असून मृगजळाप्रमाणें खोटें आहे हें जाणतो त्याला कामाचा कुसुमशर मोडून टाकून यमाला भेटण्याची पाळी येत नाहीं.

४७. मन भलतीकडेच लावून फुलें वेंचीत असणाऱ्या मनुष्याला मृत्यु, नदीच्या कांठीं घोरत पडलेल्या गांवाला ज्याप्रमाणें पूर वाहून नेतो, त्याप्रमाणें घेऊन जातो.

४८. मनुष्य भलतीकडे लक्ष देऊन फुलें वेंचीत असतां विषयांनीं तो तृप्त होण्याच्या पूर्वींच मृत्यु त्याला आपल्या तावडींत घेतो.

४९. ज्याप्रमाणें फुलाला, त्याच्या वासाला किंवा रंगाला इजा न करतां मधमाशी त्याच्यामधील मध घेऊन निघून जाते त्याप्रमाणें साधूनें गांवांत रहात असावें.

५०. साधूनें आपल्या दुष्कृत्यांकडे किंवा हलगर्जीपणाकडे जितकें लक्ष दिलें पाहिजे तितकें त्याला दुसऱ्याचा दुष्टपणा किंवा पापपुण्य यांकडे लक्ष देण्याची अवश्यकता नाहीं.

५१. जो बोलल्याप्रमाणें वागत नाहीं त्याचे मोहक व निरर्थक असे शब्द उत्तम रंगाच्या बिन वासाच्या सुंदर फुलाप्रमाणें वायफळ समजावे.

५२. परंतु बोलल्याप्रमाणें जो वागतो त्याचे ते सुंदर व सार्थ शब्द उत्तम रंगाच्या, सुवासिक अशा सुंदर फुलांप्रमाणें होत.

५३. पुष्पराशीमधून ज्याप्रमाणें पुष्कळ प्रकारच्या माळा गुंफतां येतात त्याप्रमाणें मनुष्य जन्माला आला असतां पुष्कळ गोष्टी त्याला करतां येतात.

५४. फुलांचा, चंदनाचा, तगराचा किंवा मल्लिकेचा वास वाऱ्याच्या उलट कधीं वहात नाहीं; परंतु भल्या मनुष्याचा सुगंध वाऱ्याच्या उलट वहातो. भल्या मनुष्याचा सुगंध सर्वत्र भरून रहातो.

५५. चंदन किंवा तगर, कमल किंवा वासिकी यांच्या सुगंधाहून सद्गुणाचा सुगंध या सर्वांना मागें सारणारा आहे.

५६. तगर किंवा चंदन यांचा सुवास तुच्छ असून गुणवान लोकांचा सुगंध देवापर्यंत वर जाऊन पोहोंचतो.

५७. जे सुविचारी आपल्या अंगीं नाना सद्गुण बाळगून सत्य ज्ञानानें मुक्त असतात, त्यांच्या ठिकाणीं कामाचें कांहीं चालत नाहीं.

५८—५९. ज्याप्रमाणें आनंददायक अशा सुवासानें भरलेलें मुईकमळ रस्त्यांत फेंकलेल्या कचऱ्याच्या ढिगावर वाढतें, त्याप्रमाणें कचऱ्यासारखे असणाऱ्या या अंधारांत चांचपणाऱ्या जगामध्यें सत्यज्ञान झालेला बुद्ध शिष्य ज्ञानाच्या योगानें सर्वांवर झळकत रहातो.

---

## पांचवा पाद.

### मूर्ख.

६०. ज्याला झोंप नाहीं, त्याला रात्र लांब वाटते; जो थकला आहे, त्याला मैल लांब वाटतो; तसेंच ज्याला धमतत्त्व उमगलें नाहीं, त्या मूर्खाला आयुष्य कंटाळवाणें वाटतें.

६१. प्रवाशाला आपल्यापेक्षां वरिष्ठ किंवा आपल्या बरोबरीचा न भेटेल तर त्यानें दृढनिश्चयानें एकट्यानें प्रवास करावा. मूर्खाशीं संगत कामाची नाहीं.

६२. हीं मुलें माझीं, हा पैसा माझा, अशा विचारांनीं मूर्ख मनुष्य क्लेश पावतो. त्याच्या स्वतःवर त्याचें स्वामित्व नाहीं; मग मुलांवर किंवा पैशावर कोठून असणार ?

६३. ज्या मूर्खाला आपण मूर्ख आहों हें कळतें तो तेवढ्यानें तरी शहाणा असतो. परंतु ज्या मूर्खाला आपण शहाणे आहों असें वाटत असतें तो खरोखरच मूर्ख.

६४. मूर्ख मनुष्यानें जरी जन्मभर शहाण्याशीं संगत ठेविली तरी चमचाला ज्यामानानें रसाची गोडी कळते तितकेंच सत्य त्याला उमगतें.

६५. बुद्धिमान मनुष्य एक क्षणभर जरी शहाण्याच्या संगतीला असला तरी त्याला जिभेला ज्याप्रमाणें रसाची चव कळते त्याप्रमाणें त्याला तत्त्व कळूं लागतें.

६६. कोत्या बुद्धीचे मूर्ख हेच स्वतःचे मोठे शत्रू असतात. कारण त्यांच्या हातून जीं दुष्कृत्यें घडतात त्यांचीं कडू फळें त्यांना भोगावीं लागतात.

६७. ज्याच्या योगानें मनुष्याला पश्चात्ताप करण्याची पाळी

येऊन डोळ्यांतून पाणी काढीत ज्याचें फळ भोगावें लागतें असें हातून घडलेलें कृत्य वाईट समजावें.

६८. ज्याच्यासंबंधानें पश्चात्ताप करण्याची पाळी न येतां ज्याचें फळ मोठ्या आनंदानें भोगतां येतें असें हातून घडलेलें कृत्य चांगलें समजावें.

६९. जोंपर्यंत दुष्कृत्य फळाला येत नाहीं तोंपर्यंत मूर्खाला तें मधासारखें गोड वाटतें; परंतु तें पक्क दशेला आलें असतां त्याला दुःख भोगावें लागतें.

७०. मूर्खाला महिनोगणती आपलें अन्न यतीप्रमाणें दर्भाच्या टोकानें खात राहूं दे तरी धर्म ज्यांनीं बरोबर जोखला आहे अशां-च्या सोळाव्या हिश्शालासुद्धां तो लागणार नाहीं.

७१. नुकत्या काढलेल्या दुधाप्रमाणें दुष्कृत्याचा तात्काळ परि-णाम होत नाहीं. परंतु राखेंत झांकून ठेवलेल्या विस्तवाप्रमाणें धुमसत राहून तें मूर्खाच्या मागून असतें.

७२. आणि याप्रमाणें दुष्कृत्य उघडकीस येऊन मूर्खाच्या शोकाला कारण झालें असतां तें त्याच्या सर्व वैभवावर पाणी पा-डतें इतकेंच नाहीं, तर तें त्याचें डोकें पार करतें.

७३. मूर्खाला वृथा कीर्ति, भिक्षूंमध्यें अग्रणीत्व, मठाधिपतित्व किंवा लोकांमध्यें मानमान्यता यांची हाव खुशाल धरूं दे.

७४. गृहस्थ किंवा यती यांना हें मीं केलें असें वाटूं दे, सर्व कृत्याकृत्यांमध्यें त्यांना माझ्या ताब्यांत असूं दे, असें मूर्खाच्या मनाला वाटत असते, आणि त्याची इच्छा व गर्व याप्रमाणें वाढत रहातात.

७५. पैशाचा रस्ता निराळा व मोक्षाचा निराळा, हें बुधशिष्य भि-क्षूला उमगलें ह्मणजे तो मानाच्या मागें न लागतां विवेकाच्या मागें लागेल.

# सहावा पाद.

## विद्वान (पंडित)

७६. काय टाळावें व कोठें चुकतें हें सांगणारा बुद्धिमान मनुष्य भेटला असतां गुप्त ठेवा दाखवून देणाऱ्या मनुष्याच्या मागून ज्याप्रमाणें जावें त्याप्रमाणें त्या शहाण्याच्या मागें लागावें. मागें लागणाराचें त्यांत कल्याणच होऊन अकल्याण कधीं व्हावयाचें नाहीं.

७७. असा मनुष्य त्याला कानउघाडणी करीत राहूं दे, शिकवीत राहूं दे, व चूक दाखवीत राहूं दे. भल्यांना असा मनुष्य आवडता होतो. वाईट लोक मात्र याचा द्वेष करतात.

७८. दुष्कृत्य करणाऱ्या लोकांशीं मैत्री करूं नका, हलकटाशीं मैत्री करूं नका. जे उत्तम ठरले आहेत अशा सद्गुणी लोकांना मित्र करा.

७९. जो धर्मोपदेश गट्ट करतो तो शांत मनानें सुखांत असतो. आर्यांनीं सांगितलेल्या धर्मामध्यें शहाण्यांना नेहमीं आनंद होतो.

८०. विहीर खोदणारांना पाणी वाटेल तिकडे लावून देतां येतें, तिरंदाजांना धनुष्य हवें तसें वांकवितां येतें, सुतार लांकडाला वांकवितात, त्याप्रमाणें विद्वानांना स्वतःला वाटेल तसें वळण देतां येतें.

८१. ज्याप्रमाणें भक्कम खडक वाऱ्यानें डगमगत नाहीं, त्याप्रमाणें शहाणे लोक निंदा किंवा स्तुति यांनीं डगमगत नाहींत.

८२. खोल, निर्मळ व शांत अशा सरोवराप्रमाणें धर्मश्रवणानंतर शहाणे लोक शांत होतात.

८३. भले लोक सर्व स्थितीमध्यें मोठ्या हुषारीनें वावरतात. कामाच्या तडाक्यांत जाऊन ते कधीं कांहीं बोलत नाहींत. शहाणे लोक सुखानें चढत नाहींत किंवा दुःखानें पडत नाहींत.

८४. स्वतःसाठीं ह्मणा किंवा दुसऱ्यासाठीं ह्मणा, जो मुलाची,

पैशाची, स्वामित्वाची किंवा अन्यायानें जय मिळविण्याची इच्छा धरीत नाहीं तोच भला, विद्वान व सद्गुणी समजावा.

८५. पैल तीराला पोहोंचणारे लोक फार थोडे असतात. बाकी सर्व किनाऱ्यावरच इकडून तिकडे घोंटाळत असतात.

८६. परंतु जे सांगितलेल्या धर्माप्रमाणें वागतात ते दुर्घट अशा मृत्यूच्या तडाक्यांतून सुटतात.

८७–८८. शहाण्या मनुष्यानें अज्ञान स्थिति सोडून उजळ स्थितीच्या मार्गे लागावें घर सोडून, ना घर ना दार अशा ह्या एकांताच्या स्थितींत जेथें सुख दुर्मिळ वाटत असतें त्याच ठिकाणीं सुख शोधूं लागावें. सर्व सुखांना मागें सारून कशावर ममता न ठेवतां विद्वानानें सर्व मानसिक व्यथा दूरकराव्या.

८९. ज्यांचीं मनें (सात) ज्ञानतत्त्वामध्यें मुरलीं असून जे कशावर आसक्ति न ठेवतां विषयासक्तीपासून दूर असण्यांतच आनंद मानतात, ज्यांनीं तृष्णेला दाबली आहे व ज्यांच्यावर पूर्ण प्रकाश पडला आहे तेच या जगांत खरोखर मुक्त होत.

---

# सातवा पाद.

## पूज्य (अर्हत्)

९०. ज्यानें आपल्या दुःखाला रजा देऊन सर्व बाजूंनीं स्वतःला मुक्त करून घेऊन पाश तोडून टाकले आहेत, व संसारयात्रा संपविली आहे अशाला क्लेश ह्मणून उरत नाहींत.

९१. हे एकाग्रतेनें प्रयत्न करून घरीं न राहतां आपल्या सरोवराला सोडणाऱ्या हंसाप्रमाणें घरदार सोडतात.

९२. जवळ पैसा न ठेवतां जे भिक्षान्नावर राहतात व ज्यांना

निर्वाण दिसला आहे त्यांचा मार्ग आकाशांतील पक्ष्यांच्या मार्गाप्रमाणें दुर्गम असतो.

९३. ज्याची तृषा शांत झाली आहे, जो विषयोपभोगामध्यें आसक्त नाहीं आणि ज्याला निर्वाण दिसला आहे, अशाचा मार्ग आकाशांतील पक्ष्याप्रमाणें कळण्यास कठीण आहे.

९४. सारथ्यानें वाटेवर आणलेल्या घोड्याप्रमाणें ज्याचीं इंद्रियें जिकलीं गेलीं आहेत, ज्याला गर्व नाहीं व तृषेनें ज्याला सोडलें आहे, अशा मनुष्याचा देवसुद्धां हेवा करतात.

९५. जो मनुष्य आपलें कर्तव्य बजावतो तो पृथ्वीप्रमाणें क्षमावान, उंबरठ्याप्रमाणें वाटेल तें सहन करणारा आणि निर्मल सरोवराप्रमाणें स्वच्छ असतो. अशा मनुष्यासाठीं पुनर्जन्म उरत नाहीं.

९६. जो सत्य ज्ञानानें मुक्त होऊन शांत झाला आहे त्याचे विचार, आचार व कृती सर्व स्थिर असतात.

९७. भोळेपणांतून सुटून ज्याला आज अशा परमात्म्याची ओळख पटली आहे, ज्यानें सर्व बंध तोडून टाकून सर्व मोह व वासना दूर केल्या आहेत तोच थोर मनुष्य.

९८. झोपडींत किंवा जंगलांत, समुद्रावर किंवा जमिनीवर जेथें जेथें ह्मणून पूज्य लोक राहतात ती ती जागा आल्हाददायक असते.

९९. वनेंसुद्धां आनंददायक होतात. जेथें जगाला मुळीं आनंद दिसत नाहीं तेथें विरागी मनुष्यांना आनंद होतो. कारण ऐहिक सुखाकडे त्यांची मुळीं दृष्टी नसते.

---

## आठवा पाद.

### सहस्र.

१००. वायफळ अशा हजारों शब्दांनीं जरी भाषण पूर्ण असलें

तरी तें निरुपयोगी आहे. ऐकल्याबरोबर मनुष्याला गप्प करणारा एक अकलेचा शब्द त्यांहून अधिक चांगला.

१०१. हजारों वायफळ शब्द गोंवलेला श्लोक फुकट असून ऐकल्याबरोबर मनुष्याला गप्प करणारा त्यांतील एक अकलेचा शब्द अधिक चांगला आहे.

१०२. हजारों उच्चारलेले वायफळ श्लोक निरर्थक असून ऐकल्याबरोबर मनुष्याला गप्प करणारा एक धर्माचा शब्द त्यांहून चांगला.

१०३. एका मनुष्यानें रणांत हजारों लोकांना जिंकलें व दुसऱ्यानें स्वतःला जिंकलें, तर यांमध्यें दुसराच मोठा विजयी होय.

१०४।१०५. आत्मजय हजारों लोकांना जिंकण्यापेक्षां श्रेष्ठ आहे. ज्यानें स्वतःला जिंकून आत्मनिग्रह केला आहे, त्याचा तो जय देव, गंधर्व, काम, ब्रह्मदेव यांनासुद्धां नाहींसा करतां येत नाहीं.

१०६. मनुष्यानें हजारों महिने महिन्याच्या महिन्याला यज्ञ केले आणि त्यानें एक क्षणभर ज्याचें अंतःकरण शुद्ध ज्ञानानें बनलें आहे त्याला मान दिला, तर हें मान देणें शेंकडों वर्षांच्या यज्ञाहून श्रेष्ठ आहे.

१०७. मनुष्यानें शेंकडों वर्षें अग्नीची पूजा केली तरी त्याहून सत्य ज्ञानानें ज्याचें अंतःकरण बनलें आहे अशा मनुष्याला एक क्षणभर मान देणें अधिक श्रेयस्कर आहे.

१०८. हवी व बली देऊन सबंध वर्ष पुण्यसंचयाकरितां यज्ञ करणें, हें पुण्यवानाला मान देण्याच्या एक चतुर्थांशाच्या तोडीचें नाहीं. पुण्यवानांना मान देणें अधिक चांगलें आहे.

१०९. जो वृद्धांना नेहमीं नमस्कार करून मान देतो त्याचें आयुष्य, रूप, सुख व शक्ति वाढतात.

११०. जो शेंकडों वर्षें इंद्रियांवर दाब न ठेवितां, दुर्व्यसनामध्यें आयुष्य घालवितो; अशाच्या आयुष्यापेक्षां सद्गुणानें विचारामध्यें गेलेलें एक दिवसाचें आयुष्य अधिक चांगलें.

१११. आपल्यावर दाब न ठेवतां अज्ञानांत शंभर वर्षें जगण्यापेक्षां सज्ञानामध्यें विचारांत घालविलेलें एक दिवसाचें आयुष्य अधिक चांगलें.

११२. आळसांत व दुबळेपणांत शेंकडों वर्षें जगण्यापेक्षां स्थिर सामर्थ्य मिळवून एक दिवस जगलेलें बरें.

११३. आदि व अंत यांकडे दृष्टि न पोहोंचवितां शेंकडों वर्षें जगण्यापेक्षां आदि व अंत पाहू लागून एक दिवस जगलेलें बरें.

११४. अमरपद डोळ्यांपुढें न आणतां शेंकडों वर्षें जगण्यापेक्षां तें डोळ्यांपुढें आणून एक दिवस जगलेलें बरें.

२१५. श्रेष्ठ धर्म न कळतां शेंकडों वर्षें जगण्यापेक्षां तो कळून एक दिवस जगणें बरें.

---

## नववा पाद.

### अधर्म.

२१६. मनुष्यानें धर्माकडे लक्ष देऊन आपले विचार अधर्मापासून दूर ठेवावे. चांगली गोष्ट करण्याला मनुष्य आळस करील तर त्याचें मन वाईट गोष्टींत आनंद मानून घेऊं लागेल.

११७. मानुष्याच्या हातून वाईट गोष्ट घडली असतां फिरून तस न करण्याची खबरदारी घेऊन दुष्कृत्यांतच मजा वाटून घेऊं नये. तीं सांठूं लागलीं असतां दुःखाला कारण होतात.

११८. मनुष्याच्या हातून एखादी चांगली गोष्ट घडली असतां

तशाच प्रकारचीं कामें त्यानें फिरून फिरून करून त्यांत आनंद मानावा. सत्कृत्यें सांठत गेल्यानें तीं आनंदाला कारण होतात.

११९. दुष्कृत्यें करणारांना सुद्धां त्याचीं तीं कृत्यें परिपक्व झालीं नाहींत तोंपर्यंत सुख होतें; परंतु तीं परिपक्वतेला आल्यावर मग त्यांचा दुष्परिणाम त्याला कळूं लागतो.

१२०. तसेंच सत्कृत्यें परिपक्वतेला येईतोंपर्यंत भल्या मनुष्याला वाईट दिवस पहावे लागतात; परंतु त्याचीं सत्कृत्यें परिपक्वतेला आल्यावर कल्याण त्याच्यापुढें हात जोडून उभें रहातें.

१२१. पाप मला चिकटणार नाहीं, असें मनांत समजून कोणीही त्यासंबंधानें बेपर्वा राहूं नये. पाण्याच्या थेंब थेंब गळण्यानें देखील भांडें भरतें. त्याप्रमाणें मूर्ख मनुष्य पापाचा थोडथोडा संचय करीत गेला तरी तो पापपूर्ण बनतो.

१२२. त्याचें फल मला मिळणार नाहीं, असें समजून कोणींही चांगल्या गोष्टींकडे दुर्लक्ष करूं नये. पाण्याच्या थेंब थेंब गळण्यानें भांडें भरतें; तसें थोडथोडया पुण्यसंचयानें सुद्धां शहाणा मनुष्य पुण्यपूर्ण बनतो.

१२३. सोबती थोडे असून पुष्कळ दौलत बरोबर घेऊन चाललेला व्यापारी ज्याप्रमाणें धोक्याचा मार्ग टाळतो, किंवा जीव हवासा वाटणारा मनुष्य ज्याप्रमाणें विषाला शिवत नाहीं, त्याप्रमाणें भल्या मनुष्यानें दुष्कृत्यें टाळावीं.

१२४. ज्याच्या हाताला जखम नाहीं त्यानें विषाला खुशाल शिवावें. बिनजखमेच्या ठिकाणीं विष कांहीं करीत नाहीं; त्याचप्रमाणें जो दुष्कर्म कधीं करीत नाहीं त्याला त्याचें फळ भोगावें लागत नाहीं.

१२५. शुद्ध, गरीब व निरुपद्रवी अशा मनुष्याला जर एखादा

मनुष्य दुखवील तर वाऱ्याच्या समोर फेकलेल्या धुळीप्रमाणें त्याचें फळ त्याला भोगावें लागतें.

१२६. कांहींना पुनर्जन्म येतो; दुष्कृत्यें करणारे नरकाला जातात; सत्कृत्यें करणारे स्वर्गाला जातात; परंतु सर्व विषयवासनेपासून जे मोकळे आहेत, त्यांना मोक्ष मिळतो.

१२७. आकाशांत, समुद्रांत, किंवा पर्वताच्या बेचक्यांत, जगाच्या पाठीवर अशी एकही जागा नाहीं कीं, जेथें मनुष्य आपल्या दुष्कृत्यापासून सुटून जाईल.

१२८. आकाशांत, समुद्रामध्यें किंवा पर्वताच्या बेचक्यांत, जगाच्या पाठीवर अशी एकही जागा नाहीं कीं, जेथें मृत्यु मनुष्याला गांठणार नाहीं.

---

## दहावा पाद.

### शिक्षा.

१२९. सर्व लोकांना शिक्षेचें नांव ऐकून चळकांप उत्पन्न होतो, सर्वांना मृत्यूचें भय वाटतें, आपण त्यापैकीं एक आहोंत हें लक्षांत बाळगून कोणाला मारूं नये किंवा मारवूं नये.

१३३. सर्व मनुष्यांना शिक्षेची भीति वाटत असून प्राण हवासा वाटतो. आपण त्यासारखेच एक आहों, हें लक्षांत धरून कोणाला मारूं नये किंवा मारवूं नये.

१३१. जो सुखाच्या मागें लागून सुख हवेंसें वाटणाऱ्या प्राण्यांना दुखवितो किंवा मारतो, त्याला मेल्यावर सुख मिळत नाहीं.

१३२. जो स्वतःच्या सुखामागें लागून सुखाच्याच मागें असले-

ऱ्या दुसऱ्यांना पीडा देत नाहीं किंवा मारीत नाहीं, त्याला मेल्यानंतर सुख मिळतें.

१३३. कोणाला कडक बोलूं नये. ज्याला आपण कांहीं बोलतों तो तशाच रीतीनें आपल्याला उत्तर देईल. रागाचें भाषण दुःखाला कारण होतें. जसें द्यावें तसें घ्यावें लागतें.

१३४. फुटक्या थाळीप्रमाणें राग सोडून मनुष्यानें शब्द काढला नाहीं म्हणजे तो मोक्षाला पोहोंचला समजावयाचा.

१३५. ज्याप्रमाणें गुराखी आपल्या काठीनें गुरांना गोठ्याकडे घेऊन जातो त्याप्रमाणें जरा व मृत्यु मनुष्याचें आयुष्य घेऊन चालले आहेत.

१३६. मूर्ख मनुष्य दुष्कृत्यें करतो, तेव्हां तीं त्याला कळत नाहींत; परंतु आगींत भाजून निघाल्याप्रमाणें पुढें त्या पाप्याला आपल्या दुष्कृत्याबद्दल संताप होतो.

१३७–४०. जो गरीब, निरुपद्रवी मनुष्यांना पीडा देतो, त्याच्यावर मस्तकशूल, हानि, शरीरहानि, मोठें दुःख, बुद्धिभ्रंश, राजसंकट, भयंकर आरोप, बांधवहानि, द्रव्यहानि, विद्युत्पातानें गृहहानि या दहा संकटांपैकीं एखादें गुदरून देह ठेवल्यावर त्या मूर्खाला नरक पहावा लागतो.

१४१. नागवें राहणें, केसांची पेड सोडणें, अंग धुळीनें भरून घेणें, उपास करणें, जमिनीवर पडणें, अंगाला राख फांसून घेणें, कांहीं हालचाल न करतां स्तब्ध रहाणें, या गोष्टींनीं ज्यानें वासना जिंकल्या नाहींत, अशा मनुष्याला कधीं शुद्धता येत नसते.

१४२. भपकेदार पोषाख असून सुद्धां शांति ठेवून जो स्वस्थ जितेंद्रिय, आत्मनिग्रही, शुद्ध, असा होऊन दुसऱ्याचे दोष काढीनासा झाला आहे तोच ब्राह्मण, तोच तापसी, तोच भिक्षु.

१४३. पाणीदार घोडा ज्याप्रमाणें चाबकाचें कारण ठेवीत नाहीं त्याप्रमाणें जो दुसऱ्याला निंदेला अवकाशच देत नाहीं, इतका लज्जेचा आपल्यावर दाब असणारा या जगांत कोण आहे?

१४४. कोरडा बसलेल्या पाणीदार घोड्याप्रमाणें नेट धरून व कळकळ बाळगून श्रद्धा, सद्गुण, उत्साह, ध्यान, धर्म, ज्ञान, यांच्यायोगानें या महद्दुःखाला जिंकतां येणार आहे. ज्ञान व वर्तन यांमध्यें पूर्णता मिळवून कधीं स्वतःला भूल पडूं देऊं नये.

१४५ विहीर खोदणारे प्राणी वाटेल तिकडे लावून देतात, तिरंदाज धनुष्य, सुतार लांकूड वाटेल तसें वांकवितात; त्याप्रमाणें भल्या लोकांना वाटेल तसें वळवितां येतें.

---

# पाद अकरावा.

## जरा.

१४६. हें जग सदां पेटून राहिलें असतां हासें कसें यावें किंवा आनंद तरी कसा व्हावा. अंधारामध्यें गुरफटला असतां मनुष्यानें प्रकाश मिळवण्याची कांहीं खटपट कां करूं नये?

१४७ जखमांनीं भरून निघालेले, व्याधिग्रस्त व चिंताग्रस्त स्वतःवर स्वतःचा जोरा किंवा तावा मुळीं नसलेल्या या एकवटून तयार केलेल्या मातीच्या पिंडाकडे पहा.

१४८. हें शरीर क्षीणतेला पावणारें व्याधिग्रस्त व भंगुर आहे. घाणीच्या गोळ्याप्राणें याचे तुकडे तुकडे होतात. आयुष्याचा खात्रीनें मरणांत शेवट आहे.

१४९ शरदृतूंत फेकून दिलेल्या भोपळ्याप्रमाणें ह्या वठलेल्या हाडांकडे पाहून जीवितांमध्यें काय मोठेंसें सुख आहे?

१५० हाडाचा किल्ला बनवून त्याला मांसरक्ताचें लिंपण देऊन

त्यामध्यें जरा, मृत्यु, अभिमान व कपट यांनीं आपलें बिऱ्हाड केलें आहे.

१५१ राजांचे उत्तम रथ नाश पावतात. हा देह देखील नाशालाच पोहोंचतो; परंतु भल्या लोकांच्या सद्गुणाला कधीं नाश नाहीं, असे भले लोक भल्याला सांगत असतात.

१५२ ज्यानें ज्ञान संपादन मुळींच केलें नाहीं ह्मटलें तरी चालेल, असा मनुष्य उगीच बैलाप्रमाणें वाढत राहतो. त्याचें मांस नुसतें वाढत राहतें; परंतु ज्ञान कांहीं वाढत नाहीं.

१५३–१५४ ह्या इमारतीच्या कर्त्याचा शोध करीत मी अनेक जन्मामधून फिरलों, परंतु मला आजपर्यंत सांपडला नाहींस. फिरून फिरून जन्म घेणें हें फार कष्टमय आहे. परंतु आतां हे तूं, ही इमारत उभारणाऱ्या, तूं मला सांपडला आहेस. आतां मी तुला ही इमारत फिरून उभारूं देणार नाहीं. याचे सर्व वासे मोडून जाऊन पाखाड्याचे तुकडे तुकडे पडले आहेत. मन शाश्वत अशा निर्वाणाकडे जाऊन पोहोंचलें असल्यानें त्याच्या सर्व वासना नाहींशा झाल्या आहेत.

१५५. ज्यांनीं स्वतःला नीट वळण लावून घेऊन तरुणपणीं पैसा मिळविला नाहीं असे लोक मासे नाहींसे झालेल्या सरोवराच्या तीरावरील खंगलेल्या बकाप्रमाणें नाश पावतात.

१५६. ज्यांनीं स्वतःला योग्य वळण, लावून घेऊन तरुणपणीं पैसा मिळविला नाहीं. त्यांना मोडक्या धनुष्यांप्रमाणें गतगोष्टींसंबधानें रडत बसावें लागतें.

---

# पाद बारावा.

## स्वतः.

१५७ मनुष्याचें स्वतःवर प्रेम असेल तर त्यानें मोठ्या हुषारीनें

स्वतःकडे लक्ष पुरवावें. तीन प्रहरांपैकीं निदान एक प्रहर तरी शहाण्या मनुष्यानें जागत रहावें.

१५८ प्रत्येक मनुष्यानें प्रथम स्वतः योग्य गोष्टीकडे लक्ष लावून मग दुसऱ्याला शिकविण्याला निघावें. अशा रीतीनें शहाण्याला कधीं दुःख भोगावें लागत नाहीं.

१५९. जर मनुष्य दुसऱ्याला शिकवितो त्याप्रमाणें स्वतः वागूं लागेल तर याप्रमाणें स्वतःला ताब्यांत ठेवल्यावर त्याला दुसऱ्याला सहज ताब्यांत ठेवतां येतें; कारण स्वतःला ताब्यांत ठेवतां येणें हेंच फार कठीण काम आहे.

१६० स्वतःचा स्वामी आत्मा हाच आहे. दुसरा कोण तो असूं शकणार? तेव्हां स्वतःवर चांगला दाब ठेवल्यानें जो थोड्यांच्याच हातीं लागतो असा हा स्वामी मनुष्याच्या हातीं लागतो.

१६१. मनुष्य स्वतः उपन्न करून स्वतः वाढवून जें संकट स्वतःवर ओढवून घेतो तें त्या मूर्खाला हिरा ज्याप्रमाणें हिऱ्याला फोडतो त्याप्रमाणें चिरडून टाकतें.

१६२. झाडाला वेढून घेणारी वेल ज्याप्रमाणें त्याला वाटेल तशी वांकविते त्याप्रमाणें जो मोठा दुष्ट आहे तो त्याच्या शत्रूंना तो ज्या स्थितीमध्यें यावासें वाटत असतें त्या स्थितीला स्वतःला आणून घेतो.

१६३. दुष्कृत्यें त्याचमाणें स्वतःला अपायकारक अशीं कृत्यें सहज घडून जातात. हिताचें व चांगलें असें कृत्यें हातून घडणें फार कठीण आहे.

१६४. पूज्य, आर्य व सद्गुणी अशा लोकांचे नियम तुच्छ समजून जो मूर्ख मनुष्य खोट्या मताला धरून बसतो तो कळकाप्रमाणें स्वतःच्या नाशाचें साधन तयार करून घेतो.

१६५. मनुष्य स्वतः दुष्कृत्यें करतो व स्वतःच त्याचें फळ भोगतो. स्वतः दुष्कृत्यें न करतां राहील तर स्वतःच स्वतःला पावन करून घेतो. शुद्ध व अशुद्ध लोक स्वतःच्या योगानें चढतात किंवा पडतात. कोणी कोणाला पावन करूं शकत नाहीं.

१६६. स्वतःचें कर्तव्य कितीही मोठें असलें तरी तें दुसऱ्यानें करावयाचें आहे असें समजून मनुष्यानें विसरून जाऊं नये. मनुष्याला स्वतःचें कर्तव्य कळल्यावर त्यासंबंधानें त्यानें अगदीं सावध असावें.

---

# पाद तेरावा.

## लोक.

१६७ हीन धर्माकडे प्रवृत्ति ठेवूं नये. अविचारानें राहूं नये. खोट्या मताला चिकटूं नये. जगाशीं लगट करूं नये.

१६८ जागा हो. आळसांत राहूं नकोस. चांगल्या रीतीनें रहा. धर्माकडे लक्ष देऊन असणारे इहपर सुखांत रहातात.

१६९. धर्मानें वागावें. अधर्मानें वागूं नये. धर्माकडे लक्ष देऊन असणारे इहपर सुखांत रहातात.

१७०. या जगाकडे पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें किंवा मृगजळाप्रमाणें नजर देऊन रहा. याप्रमाणें जगावर दृष्टी देऊन असणाराकडे मृत्यु पहात सुद्धां नाहीं.

१७१. चल, या राजरथाप्रमाणें चकाकणाऱ्या जगाकडे दृष्टी फेक. मूर्ख लोक यांत शिरतात; परंतु विद्वान लोक याला शिवत सुद्धां नाहींत.

१७२. प्रथम हातून चूक घडून पुढें जो तशी चूक घडूं देत नाहीं तो ढगांतून बाहेर पडलेल्या चंद्राप्रमाणें या लोकावर प्रकाश पाडतो.

१७३. ज्याचीं दुष्कृत्यें सत्कृत्यानें झांकून निघतात, तो ढगां-तून बाहेर पडलेल्या चंद्राप्रमाणें या लोकावर प्रकाश पाडतो.

१७४. हा लोक तमोमय असून यामध्यें थोड्यांनाच दिसतें. जाळ्यांतून सुटणाऱ्या पक्ष्याप्रमाणें फार थोडे यांतून सुटून स्वर्गाला जातात.

१७५. हंस आकाशमार्गानें मोठ्या चमत्कारिक रीतीनें सूर्यमार्गानें संचार करतात. त्याप्रमाणें शहाणे, काम व त्याच्या भोंवतालचें लटांबर यांच्यांतून मुक्त झाले असतां या जगाच्या बाहेर पडतात,

१७६. मनुष्याच्या हातून एका धर्माचें उल्लंघन होऊन तो खोटें बोलून परलोकाला तुच्छ मानूं लागला ह्मणजे तो कोणतें पाप करील व कोणतें नाहीं, याचा नेम नाहीं.

१७७. कृपण लोक देवलोकाला कधीं जात नाहींत. मूर्ख असतात तेच औदार्याची प्रशंसा करीत नाहींत. शहाण्या मनुष्याला यांत आनंद होऊन त्याच्या योगानें परलोकामध्यें तो सुखी होतो.

१७८. पृथ्वीवरील सार्वभौमत्वापेक्षां, स्वर्गप्राप्तीपेक्षां किंवा सर्व लोकांवरील स्वामित्वापेक्षां यतिदीक्षाफल श्रेष्ठ आहे.

---

## चवदावा पाद.

### बुद्ध.

१७९. ज्याच्या जयावर फिरून जय मिळवितां येत नाहीं, ज्याच्या जयामध्यें दुसऱ्याला ढवळाढवळ करतां येत नाहीं, अशा सर्वत्र भरून असून ज्याला माग नाहीं, अशा बुद्धाला कोणत्या मार्गानें नेतां येणार?

१८०. ज्याला आपल्या विषमय पाशांनीं कोणत्याही वासनेला

भलतीकडे ओढतां येत नाहीं, अशा सर्वत्र भरून असून ज्याला माग नाहीं, अशा बुद्धाला कोणत्या मार्गानें नेतां येणार?

१८१. जे नेहमीं जागे असून आठवण ठेवून आहेत, जे धीराचे असून नेहमीं एकांतामध्यें आनंद मानून ध्यानांत गढले असतात, अशांचा देव सुद्धां हेवा करतात.

१८२. मनुष्ययोनींत जन्म येणें फार कठीण आहे, त्याचप्रमाणें मनुष्यजीवित कठीण आहे, सद्धर्मश्रवण हें कठीण आहे, त्याचप्रमाणें बुद्धत्व येणें कठीण आहे.

१८३. कोणतेंही पापकर्म करूं नका, चांगलें कर्म करीत रहा आणि चित्तशुद्धि करीत रहा, असें बुद्धांचें सांगणें आहे.

१८४. बुद्ध शांतीलाच श्रेष्ठ तप समजतात. सहनशीलतेला थोर निर्वाण समजतात; कारण दुसऱ्याचा घात करणाऱ्याला यति ह्मणतां येत नाहीं; तसेंच जो दुसऱ्याला लागून बोलतो, त्यालाही यति ह्मणतां येत नाहीं.

१८५. 'दुसऱ्याला दोष देऊं नका, दुसऱ्याचा घात करूं नका, मोक्षमार्गामध्यें वावरा, मिताहार ठेवा, एकटे निजा किंवा बसा, श्रेष्ठ विचार मनांत घोळवीत रहा,' असें बुद्धांचें सांगणें आहे.

१८६. सोन्याचा पाऊस पडून सुद्धां कामाची तृप्ति कधीं होत नाहीं. कामवासनांना तृप्ति नसून त्या दुःखाला कारण आहेत, हें जो जाणतो, तोच विद्वान.

१८७. स्वर्गसुखें मिळून सुद्धां त्यांमध्यें तृप्ति होत नाहीं. जोगी झालेल्या बुद्ध शिष्याला यांचा नाश करण्यांतच आनंद होतो.

१८८-९२. मनुष्यें भयानें पर्वत, अरण्यें, राया, पवित्र झाडें यांचा आश्रय करण्याला धांवतात; परंतु हा आश्रय कांहीं क्षेमकर आश्रय नव्हे. तसाच हा उत्तमही नव्हे. हा आश्रय केल्यानें मनुष्य आप-

त्या सर्व दुःखांपासून मुक्त होत नाहीं. जो बुद्ध, धर्म व संघ यांचा आश्रय करतो, जो निर्मळ बुद्धीच्या योगानें दुःख, दुःखाचें मूळ, दुःखाचा नाश व दुःख नाहींसें करण्याचा अष्टविध पवित्र मार्ग, या चार गोष्टींकडे लक्ष देतो, तोच त्याला क्षेमकर आश्रय होतो. तोच त्याला उत्तम आश्रय होतो. त्या आश्रयाकडे धांव घेतल्यानें मनुष्य सर्व दुःखांपासून मुक्त होतो.

१९३. सत्पुरुष सांपडणें दुर्मिळ आहे, त्याचा जन्म वाटेल तेथें होत नाहीं. जेथें अशाचा जन्म होतो, तें कुळ वैभवाला चढतें.

१९४. बुद्धांची उत्पत्ति सुखाला कारण आहे. तसाच सद्धर्माचा उपदेशही सुखाला साधन आहे. तसेंच मठांतील शांतता सुखाला कारण असून तपही तसेंच सुखाला कारण आहे.

१९५–९६. जे सत्काराला पात्र अशांचा-मग ते बुद्ध असोत किंवा श्रावक असोत-व जे पापांना बाजूला सारून शोकसागर तरून गेले आहेत, त्याचप्रमाणें ज्यांच्या हातीं मोक्ष आला असून जे निर्भय झाले आहेत, अशांचा सत्कार करतात, त्यांच्या पदरीं पडणारें पुण्य अगणित आहे.

---

# पंधरावा पाद.

## सुख.

१९७. जे आमचा द्वेष करतात, त्यांचा उलट द्वेष न करतां आम्ही सुखांत रहातों. जे आमचा द्वेष करतात, अशांमध्यें आम्ही निर्द्वेषानें रहातों.

१९८. जे आमचा हेवा करतात, त्यांचा हेवा न करतां आम्ही

सुखांत रहातों. हेवा करणाऱ्यांमध्यें त्यांचा उलट हेवा केल्यावांचून आम्ही सुखांत रहातों.

१९९. लोभी लोकांमध्यें लोभ बाजूला ठेवून आम्ही निर्लोभतेनें सुखांत रहातों.

२००. कशावर ममत्व न ठेवतां आम्ही सुखांत रहातों. सुखावर पोसून आम्ही तेजस्वी देवाप्रमाणें असूं.

२०१. जय द्वेषाला कारण होतो; कारण पराभव पावलेला मनुष्य नेहमीं दुःखी असतो. ज्यानें जयापजय दोन्ही सोडून दिले आहेत, असा समाधानी मनुष्य सुखी असतो.

२०२. रागासारखा दुसरा अग्नी नसून दोषासारखा दुसरा कली नाहीं. या दोहोंसारखें दुसरें दुःखाला कारण नसून शांतीसारखें सुख नाहीं.

२०३. सर्व रोगांमध्यें तृष्णारोग फार वाईट आहे. पंचतत्त्वें हींच मोठ्या दुःखाला कारण आहेत, हें उमगणें ह्मणजेच मोक्षरूपी मोठें सुख प्राप्त करून घेणें आहे.

२०४. आरोग्य हा सर्वांत मोठा लाभ असून समाधान हें मोठें धन आहे. विश्वास उत्तम ज्ञाती असून मोक्ष हें सर्वांत श्रेष्ठ सुख आहे.

२०५. एकांत व शांति यांचे मधुर रस ज्यानें चाखले आहेत, असा मनुष्य धर्मरस चाखीत असे तोंपर्यंत निर्भय व निष्पाप असतो.

२०६. साधूचें दर्शन कल्याणप्रद असून त्याची संगति सुखाला कारण होते. मनुष्याला जर मूर्खांचें दर्शन होणार नाहीं, तर तो खरोखर सुखी राहील.

२०७. जो मूर्खांच्या संगतीनें जातो, त्याला लांबपर्यंत रडण्याची पाळी येते. शत्रूप्रमाणें मूर्खाची संगत नेहमीं दुःखाला कारण होते. आप्त भेटल्याप्रमाणें शहाण्याची संगत सुखाला कारण होते.

२०८. ह्मणून मनुष्यानें नेहमीं शहाणा, बुद्धिवान, विद्वान, सहनशील, कर्तव्यदक्ष व थोर अशाच्या संगतीला असावें. चंद्र ज्याप्रमाणें नक्षत्रमार्गांतून आपला मार्ग ठेवतो, त्याप्रमाणें मनुष्यानें अशा शहाण्या व भल्या मनुष्याच्या मागून असावें.

---

# सोळावा पाद.

## प्रिय.

२०९. जो जीविताचा खरा उद्देश विसरून सुखासाठीं भलत्या गोष्टीकडे लक्ष देतो व द्यावयाचें त्या गोष्टीकडे लक्ष देत नाहीं, तो कालानें योग्य गोष्टीकडे लक्ष देणाराचा द्वेष करूं लागतो.

२१०. मनुष्यानें प्रियाला किंवा अप्रियाला नेहमीं चिकटून राहूं नये. प्रिय वस्तूकडे दृष्टि न देणें हें दुःखाला कारण आहे, तसेंच अप्रियाकडे लक्ष लावणें हेंही दुःखालाच कारण आहे.

२११. म्हणून मनुष्यानें कोणत्याही प्रिय वस्तूवर प्रेम ठेवूं नये; कारण प्रिय वस्तूचा नाश दुःखाला कारण आहे. ज्यांना कांहीं प्रिय नाहीं किंवा द्वेष्य नाहीं, त्यांना कांहींच पाश उरत नाहीं.

२१२. प्रिय वस्तु दु.खाला व भयाला कारण होते. जो यापासून अलग असतो, त्याला शोक उरत नाहीं. मग भयाची तर वार्ताच नको.

२१३. प्रेमापासून शोक उत्पन्न होतो व प्रेमापासून भय उत्पन्न होतें. जो प्रेमापासून अलग आहे, त्याला शोक उरत नाहीं. मग भयाचें तर नांवच नको.

२१४. रतीपासून शोक उत्पन्न होतो, रतीपासून भय उत्पन्न होतें. जो रतीपासून मुक्त आहे, त्याला शोक उरत नाहीं. मग भयाचें नांव कोठून रहाणार?

२१५. कामापासून शोक उत्पन्न होतो, कामापासून भय उत्पन्न होतें. जो कामापासून मुक्त आहे, त्याला शोक उरत नाहीं व भयाची वार्ताच रहात नाहीं.

२१६. तृष्णेपासून शोक उत्पन्न होतो, तृष्णेपासून भय उत्पन्न होतें. जो तृष्णेपासून सुटला आहे, त्याला शोक उरत नाहीं; तसेंच भयाचेंही नांव उरत नाहीं.

२१७. ज्याच्या अंगीं शील व शहाणपण आहे, जो धर्मशील व सत्यवक्ता आहे व जो आपल्या कर्तव्याकडे लक्ष देऊन असतो, तो लोकांना प्रिय होतो.

२१८. ज्याला अक्षय्य मोक्षासंबंधाचा छंद लागून समाधानवृत्ति आली आहे व कामाकडे ज्याचें लक्ष वेधलें नाहीं, अशा मनुष्याला प्रवाहानें वर वाहून नेला जाणारा ह्मणतात.

२१९. ज्ञाती, मित्र, सुहृद दूरच्या प्रवासाहून सुरक्षित परत आलेल्याचें अभिनंदन करतात.

२२०. त्याचप्रमाणें ज्याच्या हातून सत्कृत्यें घडलीं आहेत. त्याचीं तीं सत्कृत्यें तो इहलोक सोडून गेला असतां परलोकीं, परत आलेल्या ज्ञातीप्रमाणें त्याचें अभिनंदन करतात.

---

## सतरावा पाद.

### राग.

२२१. मनुष्यानें राग तसाच मान सोडून द्यावा; तसेच सर्व पाश सोडून द्यावे. नामरूपाला जो चिकटून रहात नाहीं व जो कांहींच माझें असें ह्मणत नाहीं, त्यावर कोणतेंही संकट गुदरत नाहीं.

२२२. चालू रथाप्रमाणें उठणारा राग ज्याला आवरतां येतो,

तोच खरा सारथी. दुसरे लोक केवळ हातांत लगाम पकडणारे होत.

२२३. मनुष्यानें प्रेमानें रागाला, बऱ्यानें वाइटाला, सढळ हातानें लोभ्याला व सत्यानें खोटें बोलणाराला जिंकावें.

२२४. खरें बोलावें. रागाच्या आधीन जाऊं नये. कोणी मागितलें असतां द्यावें. या तीन गोष्टी मनुष्याला देवांकडे नेऊन पोहोंचवितात.

२२५. ज्या मुनींना हिंसा ह्मणून ठाऊक नसून ज्यांचा नेहमीं देहावर दाब असतो, ते अढळ अशा निर्वाण पदाला जातात व तेथें गेल्यावर त्यांना दुःखाचें नांव उरत नसतें.

२२६. जे नेहमीं जागे राहून रात्रंदिवस अध्ययनांत राहून निर्वाणाच्या मार्गे असतात, त्यांच्या वासना आपोआप नाहींशा होतात.

२२७. ही चांगली ह्मण आजची नसून जुनी आहे कीं, जो मुकाट्यानें असतो, त्याला लोक नांवें ठेवतात, जो पुष्कळ बोलतो, त्यालाही नांवें ठेवतात व जो थोडें बोलतो, त्यालाही पण नांवें ठेवण्याला चुकत नाहींत. ज्याला कोणी नांवें ठेवीत नाहींत असा मनुष्य जगांत सांपडणेंच कठीण.

२२८. लोक ज्याची सदा निंदाच करतात किंवा ज्याची सदा स्तुतीच करतात, असा मनुष्य झाला नाहीं, होणार नाहीं व हल्लींही सांपडावयाचा नाहीं.

२२९-३०. ज्यांना सारासार विचार कळतो, असे लोक नेहमीं ज्याची, निर्दोष, शहाणा, ज्ञानसंपन्न व धर्मसंपन्न ह्मणून स्तुति करतात, अशा मनुष्याची जंबूनद सुवर्णाच्या शुद्ध नाण्याप्रमाणें निंदा करण्याचें धाडस कोण करील? ब्राह्मणही स्तुति करतात अशा त्याची देवसुद्धां स्तुति करतात.

२३१. शारीरिक रागासंबंधानें सावध राहून शरीरावर दाब

ठेवावा. शारीरिक पापें दूर करून शरीरानें पुण्याचरण करावें.

२३२. वाचिक रागासंबंधानें खबरदारी घेऊन तोंडावर दाब ठेवावा. वाचिक पाप न करतां वाचा चांगली ठेवावी.

२३३. मानसिक रागासंबंधानें खबरदारी घेऊन मनावर दाब ठेवावा. मानसिक पाप न करतां मनानें आचरण शुद्ध ठेवावें.

२३४. जे शहाणे आपल्या शरीरावर, आपल्या जिभेवर व आपल्या मनावर उत्तम दाब ठेवतात तेच खरे निग्रही होत.

---

## अठरावा पाद.

### मल.

२३५. तुझी पिकल्या पानाप्रमाणें व्यवस्था होऊन यमदूत तुझ्याजवळ येऊन हजर झाले आहेत. आतां तूं प्रस्थान करून आहेस, तरी प्रवासाची शिदोरी तुझ्याजवळ कांहीं नाहीं.

२३६. ह्मणून स्वतःला आश्रयाची जागा करून घे. श्रम कर. शहाणा हो. तुझा मळ धुवून निघून तूं निर्दोष झालास म्हणजे आर्यांच्या स्वर्गलोकाला तूं जाशील.

२३७. तुझ्या आयुष्याचा शेवट झाला असून यमाच्या जवळ येऊन तूं पोहोंचला आहेस. वाटेंत रहाण्याला तुला जागा नाहीं; तसेंच वाटेसाठीं शिदोरीही तुजजवळ नाहीं.

२३८. म्हणून आपल्याला आश्रयाची जागा करून घे. कष्ट श्रम कर. जेव्हां तुझा मळ धुवून जाऊन तूं निर्दोष होशील तेव्हां जन्मजरेच्या फेऱ्यांत तूं सांपडणार नाहींस.

२३९. शहाण्या मनुष्यानें क्षणोक्षण, हळू हळू सोनार ज्याप्रमाणें रुप्याचा मळ नाहींसा करीत असतो, त्याप्रमाणें आपला मळ नाहींसा करीत रहावें.

२४०. ज्याप्रमाणें लोखंडापासून उत्पन्न होणारा गंज, उत्पन्न
झाला असतां लोखंडाचाच नाश करतो, त्याप्रमाणें आ[illegible]
णाराचीं दुष्कृत्यें त्याला वांकड्या मार्गाकडे नेतात.

२४१. ह्मणत न राहिल्यानें मंत्रावर मळ चढतो. हात न फि-
रविल्यानें घरावर मळ चढतो. आळस वर्णाला मळीनता आणतो व दु-
र्लक्ष हा पहारेकऱ्याला मळीनता आणतो.

२४२. दुर्वर्तन बायकांना मलीनता आणतें. दात्याला मत्सर म-
ळीनता आणतो. इहपरलोकीं सर्व दुष्ट मार्ग मलीन आहेत.

२४३. परंतु या सर्वांमध्यें वाईट मळ अविद्या आहे; तेव्हां अ-
हो भिक्षूनों, हा मल टाकून देऊन निर्मल व्हा.

२४४. निर्लज्ज, काकवृत्तीचा, धर्मलंड, पाखंडी, धीट, वाटेल
तसें वागणारा, अशा मनुष्याला या जगांत रहाणें फार सोपें आहे.

२४५. परंतु भिडस्त, शुचिर्भूततेकडे लक्ष देऊन असणारा, निः-
स्पृह, शांत, निष्कलंक व बुद्धिमान, अशा मनुष्याला जीवित फार क-
ठीण जातें.

२४६–२४७. जो दुसऱ्याचा जीव घेतो, खोटें बोलतों, एखा-
दी वस्तु आपल्याला दिली नसता उपटतो, परस्त्रीशीं संबंध ठेवतो,
दारूबाज बनतो, अशा प्रकारचा मनुष्य या जगांत आपलीं मुळें आ-
पणच खणून ठेवीत असतो.

२४८. हे मानवा, लक्षांत घे कीं, ज्यांचा आपल्या इंद्रियांवर
दाब नाहीं असे लोक दुःस्थितींत असतात. लोभ व व्यसन तुला पु-
ष्कळ दिवसपर्यंत दुःखांत पाडणार नाहींत याबद्दल खबरदारी घे.

२४९. मनुष्य आपल्या श्रद्धेनुरूप व संतोषानुरूप या जगाम-
ध्यें देत असतो. जो मनुष्य दुसऱ्यांना अन्नपाणी देऊन त्याबद्दल क-
पाळाला आठ्या चढवितो, त्याला रात्रंदिवस शांति रहात नाहीं.

२५०. हा मनोविकार ज्याच्या मनांतून समूळ नाहींसा झाला असतो, त्यालाच सदोदित शांति रहाते.

२५१. वासनेसारखा दुसरा अग्नि नाहीं, दोषासारखा दुसरा मगर नाहीं, मोहासारखा दुसरा पाश नाहीं व आशेसारखी दुसरी जोरानें वाहणारी नदी नाहीं.

२५२. दुसऱ्याचे दोष लवकर दिसतात; परंतु आपले दिसणें फार कठीण आहे. भातेण्याप्रमाणें मनुष्य आपल्या शेजाऱ्याच्या दोषाला फुंकारा घालीत असतो; परंतु लुच्चा जुगारबाज ज्याप्रमाणें आपला खोटा फांसा आपल्या सोबत्याच्या नजरेला पडूं देत नाहीं, त्याप्रमाणें तो आपले दोष झांकून ठेवीत असतो.

२५३. ज्या मनुष्याचा नेहमीं दुसऱ्याचे दोष काढून त्यानें खवळण्याकडे लक्ष असतें, त्याचे मनोविकार नेहमीं वाढत राहतात. ते त्याला कधीं नाहींसे करतां येत नाहींत.

२५४. आकाशामध्यें मार्ग नाहीं. केवळ बाह्य भपक्यांनीं मनुष्य श्रमण होत नाहीं. हें जग पोकळ डौलांत आनंद मानून घेतें. तत्त्ववेत्ते बुद्ध ह्या दोषापासून मुक्त असतात.

२५५. आकाशांत संचाराला मार्ग नाहीं. केवळ बाह्य डामडौलानें मनुष्य श्रमण बनत नाहीं. संस्कार शाश्वत नाहींत. बुद्ध तेवढा निश्चयापासून ढळत नाहीं.

---

# पाद एकोणिसावा.

## धर्मार्थ.

२५६-५७. मनुष्य एखादी गोष्ट सामर्थ्याच्या जोरावर करील तर तें त्याचें कृत्य न्यायाचें होणार नाहीं. ज्या मनुष्याला खरें खोटें कळतें व जो स्वतः विद्वान व बुद्धिमान असून बलात्कारावांचून सर-

ळपणानें दुसऱ्याला आपल्याबरोबर नेतो व धर्मरक्षण करतो त्यालाच सरळ ह्मणावें.

२५८. मनुष्य पुष्कळ बोलतो ह्मणूनच त्याला विद्वान ह्मणतां येत नाहीं. जो क्षमाशील, कोणाशीं वैर न करणारा व कशाला न भिणारा असतो, त्यालाच विद्वान ह्मणावें.

२५९. मनुष्य पुष्कळ बोलल्यानेंच धर्मरक्षक होत नाहीं. जरी मनुष्य थोडें शिकला असला तरी जर त्याला धर्म नीट कळला तर अशा धर्माकडे दुर्लक्ष न करणाराला धर्मरक्षक हें नांव देतां येतें.

२६०. मनुष्याचे केंस पिकले आहेत ह्मणूनच त्याला वृद्ध ह्मणतां येत नाहीं. त्याचें वय परिपक्व झालें असेल, परंतु तो फुकटच वाढला ह्मटला पाहिजे.

२६१. ज्याच्यामध्यें सत्य, सद्गुण, दया, आत्मनिग्रह, नेमस्तपणा हे गुण आहेत व जो दोषापासून मुक्त असून शहाणा आहे, त्यालाच वृद्ध ह्मणावें.

२६२. मत्सरी, कंजूष, अप्रामाणिक असा मनुष्य केवळ पुष्कळ बोलण्यानें किंवा आपल्या रूपसौंदर्यानें सन्मान्य होत नाहीं.

२६३. ज्याच्या ठिकाणीं या दुर्गुणांचा समूळ नाश झालेला दिसतो, असा शहाणा मनुष्य मत्सरापासून मुक्त झाला ह्मणजे मानाला पात्र होतो.

२६४. अशिक्षित असा खोटें बोलणारा मनुष्य केवळ डोकें मुंडल्यानें श्रमण होत नाहीं. कामलोभाच्या तडाक्यांत सांपडलेल्या मनुष्याला श्रमण कसें होतां येणार ?

२६५. जो नेहमीं पाप दूर करून असतो—मग तें लहान असो किंवा मोठें असो—तोच खरा श्रमण. कारण सर्व पापांना त्यानें शांत केलें असतें.

२६६. केवळ भिक्षा मागितल्यानेंच मनुष्य भिक्षु होत नाहीं. जो सर्व भिक्षुधर्म पाळतो, त्यालाच भिक्षु हें नांव देतां येतें. केवळ भि‍ मागणाराला तें देतां येत नाहीं.

२६७. जो पापपुण्यांच्या पलीकडे गेला असून शुचिर्भूतता ठेवून मोठ्या दक्षतेनें या संसारांतून पार पडतो, त्यालाच खरा भिक्षु ह्मणावें.

२६८–६९. मनुष्य मूर्ख व अज्ञाणी असेल तर केवळ मौन धरल्यानें तो मुनी होत नाहीं. जो ता‍ज्यांत जोखल्याप्रमाणें दोन्ही बाजू ( पापपुण्य ) तोलून चांगलें तेवढें घेतो आणि वाईट टाकतो, तोच मुनी असून त्यालाच त्याच्या योगानें मुनी हें नांव लागू पडतें.

२७०. प्राणिमात्रांची हिंसा करणाराला आर्य ह्मणतां येत नाहीं. सर्व प्राणिमात्रांवर तो दया करतो, ह्मणूनच त्याला आर्य ह्मणतात.

२७१–७२. जें मोक्षसुख, कोणत्याही संसाऱ्याला स्वप्नींसुद्धां मिळत नाहीं तें मला केवळ शिक्षणाच्या योगानें, व्रतांनीं, पुष्कळ विद्या शिकल्यानें, समाधि लावल्यानें किंवा एकटें निजल्यानेंच मिळत नाहीं. हे भिक्षो, ज्यानें वासनांचा बीमोड केला आहे, तोच विश्वास संपादन करतो.

---

# पाद विसावा.

## मार्ग.

२७३. ( पूर्वी सांगितलेला–श्लोक १९१ ) आठ प्रकारचा मार्ग उत्तम होय. थोर सत्याचीं चार तत्त्वें आहेत. वैराग्य हाच थोर सद्गुण होय व ज्याला पाहण्याला डोळे आहेत तोच मनुष्यांमध्यें श्रेष्ठ.

२७४. बुद्धीला शुद्धता देणारा हाच मार्ग असून दुसरा नाहीं. या वाटेनें जा. या वाटेला लागून काम गोंधळून जातो.

२७५. या वाटेनें जाशील तर तुला सर्व दुःखांचा शेवट लावतां येईल. शल्य काढून टाकण्याची खुबी माझ्या हातीं आल्यावर हा मार्ग मीं सांगितला आहे.

२७६. तुला स्वतःला झटलें पाहिजे. बुद्ध नुसती तुला वाट दाखवून देतील. जे विचारी या मार्गाला लागतात, ते कामपाश तोडून टाकण्याला समर्थ होतात.

२७७. सर्व सृष्टवस्तूंना नाश आहे, हें तत्त्व ज्याला कळून उमगतें तो दुःख सोसण्याला तयार असतो. हा शुद्धतेचा मार्ग आहे.

२७८. सर्व सृष्टवस्तू दुःखशोकमय आहेत. ज्याला हें कळून उमगलें आहे तो पडलेलें दुःख सोसण्याला तयार असतो. हाच शुद्धतेचा मार्ग आहे.

२७९. सर्व दृश्यवस्तू खोट्या आहेत, हें कळून उमगणारा मनुष्य दुःखाला पाठ देण्याला तयार होतो. हाच शुद्धतेला पोहोंचविणारा मार्ग आहे.

२८०. तरुण व धट्टाकट्टा असून जागा होण्याची वेळ आली असतां जो जागा न होतां आळसांत रहातो व ज्याचे संकल्प आणि विचार दुबळे आहेत, अशा आळशी मनुष्याच्या हातीं ज्ञानाचा मार्ग कधीं लागत नाहीं

२८१. मोठ्या हुषारीनें राहून मनुष्यानें कायावाचामनानें कधीं कांहीं वाईट करूं नये. तीन कर्ममार्ग तेवढे त्यानें साफ ठेवावे. ह्मणजे शहाण्यांनीं सांगितलेल्या मार्गाला तो लागलाच ह्मणावयाचा.

२८२. आस्थेनें ज्ञान मिळतें. ती नसल्यानें मनुष्य त्याला मुकतो. लाभहानींचा हा दोन प्रकारचा मार्ग जाणणाऱ्या मनुष्यानें स्वतःला अशा मार्गांत ठेवावें कीं, त्याच्या योगानें त्याचें ज्ञान वाढेल.

२८३. सर्व विषयाटवीची खच्ची करून टाक. त्यांतील एखादडु-

२९१. जो दुसऱ्याला दुःख देऊन त्याच्या योगानें स्वतःला सुख मिळविण्याची इच्छा करतो, असा मनुष्य वैरपाशामध्यें गुरफटला जाऊन त्यापासून कधींच मोकळा होत नाहीं.

२९२. जी गोष्ट केली पाहिजे तिच्याकडे दुर्लक्ष करण्यांत येतें व जी करावयाला नको अशी गोष्ट करण्यांत येते. उच्छृंखल अशा अविचारी माणसांच्या वासना नेहमीं वाढत्या प्रमाणावर असतात.

२९३. परंतु जे नेहमीं आपल्या देहावर नजर ठेवून जें करावयास नको अशा गोष्टींच्या मागें लागत नाहींत, व करावयाला पाहिजे अशा गोष्टींच्या मागें लागून ती करतात, अशा प्रकारच्या शहाण्या व दक्ष मनुष्याच्या वासनाच लय पावतात.

२९४. ( खऱ्या ) ब्राह्मणानें जरी बापाला, आईला दोघा क्षत्रिय राजांना किंवा प्रजेसह सर्व राष्ट्राला मारलें तरी त्याबद्दल तो शिक्षेला पात्र होत नाहीं.

२९५. ( खऱ्या ) ब्राह्मणानें जरी बापाला, आईला दोघा क्षत्रिय राजांना किंवा राष्ट्रांतील एखाद्या टळक मनुष्याला मारलें तरी त्याबद्दल तो शिक्षेला पात्र होत नाहीं.

२९६ गौतमबुद्धाचे शिष्य नेहमीं चांगले जागे असून त्यांचे विचार रात्रंदिवस बुद्धाकडे लागले असतात.

२९७. गौतमबुद्धाचे शिष्य नेहमीं चांगले जागे असून त्यांचे विचार रात्रंदिवस धर्माकडे लागले असतात.

२९८. गौतमबुद्धाचे शिष्य नेहमीं चांगले जागे असून त्यांचे विचार रात्रंदिवस संघाकडे लागले असतात.

२९९. गौतमबुद्धाचे शिष्य नेहमीं चांगले जागे असून रात्रंदिवस देहासंबंधी विवंचना त्यांच्या मनाला लागली असते.

सरें झाडच तोडीत बसूं नकोस. हें वनच धोक्याला मूळ आहे. तेव्हां हें वन त्याचप्रमाणें त्यांतील बारीक सारीक झाडेंझुडपें तोडून टाकल्यानें अहो भिक्षूंनों, तुह्मी यांतून पार पडाल.

२८४. जोंपर्यंत मनुष्याची स्त्रीविषयक वासना यत्किंचित् कमी झाली नाहीं, तोंपर्यंत गाईचें दूध पिणाऱ्या वांसराप्रमाणें त्याचें मन विषयाला जखडलेलें असतें.

२८५. शरत्काळांतील कमळाप्रमाणें स्वत: वरील प्रेम स्वत:च्या हातानें छाटून काढा. शांतिमार्ग कवटाळा. बुद्धानें निर्वाणमार्ग दाखवून ठेवला आहे.

२८६. मी पावसाळ्यांत येथें राहीन, हिंवाळ्यांत येथें राहीन, उन्हाळ्यांत येथें राहीन, असे मूर्खांचे विचार चाललेले असतात. परंतु मृत्यूचा विचार त्याच्या मनांत कधीं येत नाहीं.

२८७. मुलाबाळांमध्यें व गुराढोरांमध्यें सुखांत राहणाऱ्या मनुष्याच्या मनाची चलबिचल उडवून देऊन झोंपीं गेलेल्या खेड्याला वाहून नेणाऱ्या पुराप्रमाणें मृत्यु येऊन याला घेऊन जात असतो.

२८८. मृत्यूनें पकडल्यावर मनुष्याला मुलांचा, बापाचा, आप्तबांधवांचा, कोणाचा उपयोग होत नाहीं.

२८९. हें तत्त्व उमगून शीलवान शहाण्यानें निर्वाणाला पोंचविणारा मार्ग चोखाळून ठेवावा.

---

# एकविसावा पाद,

## नानाविषय.

२९०. जर अल्प सुखावर पाणी सोडून मोठें सुख मिळण्याचा संभव आहे, तर शहाण्या मनुष्यानें त्या अल्प सुखावर पाणी सोडून थोर सुखाकडे लक्ष लावावें.

३००. गौतमबुद्धाचे शिष्य नेहमीं चांगले जागे असून रात्रंदिवस त्यांच्या मनाला दयेमध्यें आनंद वाटत असतो.

३०१ गौतमबुद्धाचे शिष्य नेहमीं चांगले जागे असून रात्रंदिवस त्यांच्या मनाला ध्यानामध्यें आनंद वाटत असतो.

३०२. वैराग्यानें जगाला सोडून असणें हें काम कठीण असून जगाबरोबर त्याची मजा घेणें हेंही तितकेंच कठीण आहे. मठ हा दुःखाला कारण असून घरही तितकेंच दुःखाला कारण आहे. चार बरोबरीच्यांशीं राहणें जितकें कष्टमय आहे तितकेंच भिक्षेकरी होऊन भटकत राहणें कष्टमय आहे; म्हणून कोणीही भिक्षेकरी होऊन भटकत राहूं नये; ह्मणजे त्याला कष्टाचें नांव उरणार नाहीं.

३०३. गुणवान व यशस्वी अशा श्रद्धावान मनुष्याला—तो कोठें असला तरी—मान मिळतो.

३०४. बर्फाच्या पर्वताप्रमाणें भले लोक दुरूनच झळकतात. वाईट लोक रात्रीं सोडलेल्या बाणाप्रमाणें दिसून सुद्धां येत नाहींत.

३०५. मोठ्या हुषारीनें एकटें पडून, एकटें फिरत, कोणाच्या साहायाशिवाय स्वतःच आत्मनिग्रह ठेवून मनुष्यानें कोठें तरी वनामध्यें सुखांत काळ काढावा.

---

# पाद बाविसावा.

## निरय—अधोगती.

३०६. नसणारी गोष्ट आहे ह्मणणारा किंवा एखादी गोष्ट करून ती नाकबूल जाणारा हे दोघेही नरकाला जातात. मरणानंतर हे दोघे सारखेच समजले जाऊन परलोकीं यांची पापकर्मे करणारांमध्यें गणना होते.

३०७. केवळ खांद्यावर भगवी कंथा आडकविणारे आत्मनिग्रही नसून पापी असतात. पुष्कळ अशा प्रकारचे पापी लोक त्यांच्या पापकृत्यांनीं नरकाला जातात.

३०८. ज्याचा स्वतःवर दाब नाहीं, अशा दुष्ट मनुष्यानें राष्ट्रपिंडावर पोट जाळण्यापेक्षां अग्नीच्या ज्वाळेसारखा तापवून लाल केलेला गोळा खाऊन रहाणें चांगलें.

३०९. परस्त्रीचा लोभ धरणाऱ्या अविचारी मनुष्यासाठीं पाप, दुःखमय शय्या, शिक्षा व शेवटीं नरक या चार गोष्टी ठेविल्या असतात.

३१० याच्या योगानें पाप पदरीं पडतें. हा नरकाचा मार्ग आहे. मन खात असणाऱ्या याला तशाच स्थितींतल्या तिच्यापासून क्षणिक सुख मिळतें; परंतु त्याबद्दल कडक राजशासन भोगावें लागतें म्हणून मनुष्यानें परस्त्रीकडे लक्ष देऊं नये.

३११. दर्भाला भलत्या रीतीनें पकडलें असतां तो हात कापतो, त्याप्रमाणें भलत्या रीतीनें आचरलेलें तप नरकाला नेतें.

३१२. अविचारानें केलेलें कृत्य, मोडलेलें व्रत व हयगयीनें पाळलेलें ब्रह्मचर्य यांचें फळ कधीं चांगलें मिळत नाहीं.

३१३ एखादें कृत्य करावयाचें असल्यास मनुष्यानें तें करून टाकावें. त्यानें नेटानें त्याच्या मागें लागावें. निःकाळजी प्रवासी केवळ आपले रजःकण जास्त जास्त फैलावत रहातो.

३१४. पापकृत्य न करणें बरें; कारण मागून त्याबद्दल पश्चात्ताप होतो. सत्कृत्य करून टाकणें बरें; कारण तें केल्यानें मनुष्याला पश्चात्तापाला जागा रहात नाहीं.

३१५. आंतून बाहेरून सुरक्षित अशा सरहद्दीवरील किल्ल्याप्रमाणें मनुष्यानें स्वतःसंबंधानें खबरदारी घ्यावी. एक क्षणसुद्धां वांया

दवडूं नये; कारण, आलेली वेळ जे फुकट दवडतात, त्यांना नरकाला जाऊन रडण्याची पाळी येते.

३१६. ज्यासंबंधानें लाजण्याची गरज नाहीं अशासंबंधानें ज्यांना लाज वाटतें व ज्यासंबंधानें लाजलें पाहिजे अशा संबंधानें ज्यांना लाज वाटत नाहीं, अशा प्रकारचे लोक भलत्या मार्गाला लागून दुर्गतीला जातात.

३१७. जे ज्यासंबंधानें भ्यावयास नको त्यासंबंधानें भितात, व ज्यासंबंधानें भ्यावयास पाहिजे त्यासंबंधानें भीत नाहींत, अशा प्रकारचे लोक भलत्या मार्गाला लागून दुर्गतीला जातात.

३१८. ज्या ठिकाणीं पाप मुळीं नाहीं, अशा ठिकाणीं ज्यांना पाप दिसतें व पाप असणाऱ्या ठिकाणीं ज्यांना पाप दिसत नाहीं, अशा प्रकारचे लोक खोट्या मार्गाला चिकटून दुर्गतीला जातात.

३१९. जेथें पाप आहे, अशा ठिकाणीं ज्यांना पाप दिसतें व पाप नसणाऱ्या ठिकाणीं ज्यांना पाप दिसत नाहीं, असे लोक खऱ्या मार्गाला लागून सद्गतीला जातात.

---

# पाद तेविसावा.

## नाग–हत्ती.

३२०. ज्याप्रमाणें युद्धांत हत्ती धनुष्यापासून सुटलेला बाण निमूटपणें सहन करतो, त्याप्रमाणे मीं लोकनिंदा निमूटपणें सोसली; कारण, जग हें वाईट आहे.

३२१. मऊ पाडलेल्या हत्तीलाच युद्धाला घेऊन जातात. मऊ पाडलेल्या हत्तीवरच राजा बसतो. तसेंच जो मुकाट्यानें लोकनिंदा सहन करतो असा मनुष्यच लोकांमध्यें चांगला ठरतो.

३२२. खेंचरें, पाणीदार सिंध देशचे घोडे व दंताळ हत्ती यांना

ाऊ केले असतां ते चांगले ठरतात; परंतु स्वत:ला मऊ करून घेणें याहून चांगलें आहे.

३२३. कारण, या प्राण्यांच्या साहाय्यानें, कोणीही आजपर्यंत न तुडविलेला, जेथें मऊ पडलेला मनुष्य मऊ पडलेल्या आत्मास्वरूपी जनावरावर बसून जातो, अशा कोणाकडून मळला न गेलेल्या निर्वाणाच्या प्रदेशाला जातां येत नाहीं.

३२४. ज्याच्या गंडस्थळांतून तुरट असा मद वहात आहे व ज्याला पकडून ठेवणें दुरापास्त आहे, असा धनपालक नांवाचा हत्ती त्याला बांधून ठेवला असतां एक घास सुद्धां तोंडांत घेत नाहीं. तो आपल्या वनासाठीं झुरणीला लागलेला असतो.

३२५. मनुष्य खादाड बनून लठ्ठ माजून झोंपत होऊन पडला ह्मणजे तो मूर्ख उष्टयावर माजलेल्या डुकराप्रमाणें पुनर्जन्माच्या फेऱ्यांत सांपडतो.

३२६. हें माझें मन पूर्वीं यथेष्ट वाटेल तसें यथासुख भटकत होतें; परंतु अंकुशाला घट्ट धरून मस्त हत्तीला ताब्यांत ठेवणाऱ्या माहुताप्रमाणें मी याला आतां पूर्ण आपल्या ताब्यांत ठेवीन.

३२७. बेसावध राहूं नकोस. आपल्या विचारावर नजर ठेव. चिखलांत रुतलेल्या हत्तीप्रमाणें कुमार्गांतून आपल्याला बाहेर काढ.

३२८. शहाणा व धर्मानें चालणारा विचारी सोबती मिळेल तर मनुष्यानें हुषारीनें सर्व संकटांना बाजूला झुगारून सुखांत त्याच्यामागून असावें.

३२९. परंतु शहाणा, धर्मानें वागणारा असा विचारी सोबती न मिळेल तर विजयी राजा ज्याप्रमाणें आपला जिंकलेला प्रदेश मागें सोडून देतो, तसा आरण्यांतल्या हत्तीप्रमाणें यानें एकट्यानेंच मार्ग क्रमावा.

३३०. एकटें रहाणें चांगलें. मूर्खांशीं संगत करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आशा फार थोड्या ठेवून अरण्यांतील हत्तीप्रमाणें मनुष्यानें कांहीं पाप न करतां एकटें फिरत रहावें.

३३१. प्रसंगानें मित्र सुखावह होतात. भोग कोणत्याही कारणानें सुखावह होतात. सत्कृत्य मरणकाळीं सुखावह होतें. तसेंच दुःखाला पूर्ण फांटा देणें हें सुखाला कारण आहे.

३३२. या जगांत आईपणामध्यें, बापपणामध्यें, श्रमणत्वामध्यें व ब्राह्मणत्वामध्यें सुख आहे.

३३३. म्हातारपणापर्यंत टिकणारें शील सुखाला कारण आहे. त्याचप्रमाणें पूर्ण बिंबलेली श्रद्धा सुखावह आहे. तसाच बुद्धिलाभ सुखाला कारण असून पाप टाळणें हें तितकेंच सुखावह आहे.

---

# चोविसावा पाद,

## तृष्णा.

३३४. अविचारी मनुष्याची तृष्णा लतेप्रमाणें वाढत राहते. फलाच्या मागें लागून वनांत भटकणाऱ्या माकडाप्रमाणें एका जन्मापासून दुसऱ्या जन्माकडे तो धांव घेत राहतो.

३३५. जो या भयंकर तृष्णेच्या तावडींत जातो, त्याचीं दुःखें या जगांत वीरण गवताप्रमाणें वाढत राहतात.

३३६. परंतु या जगांत जिंकण्याला कठिण अशा भयंकर तृष्णेला जो जिंकतो, त्याचीं दुःखें कमलपत्रावरील जलबिंदूप्रमाणें गळून पडतात.

३३७. हा हितावह उपदेश मी तुम्हांला सांगतों कीं, तुह्मी जे येथें जमले आहां ते सर्व, ज्याला वाळा हवा असतो त्याला जसें आधीं वी-

ण गवत उपटून काढावें लागतें, तशीं तृष्णेचीं पाळेंमुळें खणून काढा; ह्मणजे वेताला उपटून काढणाऱ्या प्रवाहाप्रमाणें काम तुह्मांला फिरून फिरून चिरडणार नाहीं.

३३८. ज्याप्रमाणें मुळें कायम असेतोंपर्यंत झाडाला कापून काढलें तरी तें न वठतां फिरून वाढतें, त्याप्रमाणें तृष्णेला पोसणारीं मुळें जोंपर्यंत छाटून निघालीं नाहींत, तोंपर्यंत संसारदुःखाच्या फेऱ्यांत मनुष्य फिरून फिरून पडतो.

३३९, ज्याच्या वासना छत्तीस प्रवाहांनीं विषयोपभोगाकडे जोरानें वहात असतात त्या विषयाकडे लक्ष देऊन भलत्या मार्गाकडे लागलेल्या मनुष्याला तृष्णेचा ओघ वाहून नेत असतो.

३४०. हे ओघ चोहोंकडून वहात असून या लतेला नेहमीं अंकुर फुटत असतो; तेव्हां ही लता उगवते आहेशी पाहिल्याबरोबर ज्ञानाच्या योगानें याचें मूळ उपटून काढलें पाहिजे.

३४१. मनुष्यमात्रांचीं विषयसुखें अनावर असून तीं जोरानें वाढ घेत असतात. त्यांच्या नादीं लागून त्यांच्यापासून मिळणाऱ्या सुखाची गोडी लागली ह्मणजे मनुष्य जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतात.

३४२. जाळ्यांत सांपडलेल्या सशाप्रमाणें तृष्णेच्या तावडींत सांपडलेले लोक पाशबद्ध होऊन चिरकाल फिरून फिरून दुःखाचे वांटेकरी होतात.

३४३. जाळ्यांत सांपडलेल्या सशाप्रमाणें तृष्णेच्या तावडींत गेलेले लोक इकडून तिकडे धांवत असतात; ह्मणून भिक्षूनें आत्मोन्नतीसाठीं वैराग्य मिळविण्याची खटपट करीत राहून तृष्णेची हकालपट्टी करावी.

३४४. तृष्णारूपी वनांतून मुक्त झाला असून जो फिरून तिचे तावडींत जातो अथवा त्याला त्यापासून मुक्त केलें असतांही जो ति-

च्याकडे धांव घेतो, अशा मनुष्याकडे पहा. मुक्त झाला असून तो फिरून आपल्याला जखडून घेत असतो.

३४५. जो पाश लोखंडाचा, लांकडाचा किंवा तागाचा केला असतो, त्याला शहाणे लोक भक्कम पाश समजत नाहींत. रत्नें, अलंकार, बायकापोरें यांच्या ठिकाणीं मोठा ओढा असणें हाच खरा भक्कम पाश आहे.

३४६. जो पाश ढिला असून आपल्याला खालीं ओढतो व तोडण्याला कठिण असतो, त्यालाच शहाणे लोक दृढ पाश समजतात. या दृढपाशाला तोडून टाकल्यावर लोक कशाची काळजी न करतां कामसुख दूर झुगारून देऊन सुखांत हे जग सोडतात.

३४७. ज्याप्रमाणें कोळी स्वतः विणलेल्या जाळ्याच्या खालीं खालीं जात असतो, त्याप्रमाणें वासनेचे गुलाम बनलेले तिच्या प्रवाहाबरोबर खालीं खालीं जात रहातात. तिला छाटून काढल्यावर शहाणे लोक निष्काळजी होऊन सर्व दुःखांना मागें टाकून पुढें निघतात.

३४८. संसाराच्या पैलतीराला निघालास असतांना जें कांहीं तुझ्यापुढें असेल, जें कांहीं मागें असेल व जें कांहीं मध्यें असेल त्या सर्वांना सोडून थेट पुढें चल. तुझें मन वासनेपासून पूर्णपणें मुक्त झालें ह्मणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांत तूं पुनः सांपडणार नाहींस.

३४९. मनुष्य शंकेनें मोह पडून जोरदार मनोविकाराच्या तावडींत सांपडून केवळ सुखाच्या मागें लागला ह्मणजे त्याची तृष्णा अधिक अधिक वाढत राहून तो आपले पाश अधिक अधिकच बळकट करून घेत असतो.

३५०. ज्या मनुष्याला शंका स्वस्थ करण्यामध्यें आनंद वाटतो व विचारानें हें सर्व दुःखमय असें वाटतें, तोच कामपाश दूर करण्याला—इतकेंच नव्हे तर—तोडून टाकण्याला समर्थ होतो.

३५१. जो पूर्णतेला पावून निर्भय, निरिच्छ व निर्दोष झाला आहे व ज्यानें संसारामधलें सर्व शल्य मोडून टाकले आहेत, त्याचा हा देह शेवटचाच समजावयाचा.

३५२. जो निरीच्छ व नी:राग झाला असून ज्याला शब्द व त्यांचा अर्थ उमगला आहे, अक्षरांचा संबंध ज्याला कळला आहे व ज्याचा हा देह शेवटचा आहे, त्याला लोक मोठा सिद्ध—महा-पुरुष—ह्मणतात.

३५३. मीं सर्व जिंकलें आहे, मला सर्व कळतें, आयुष्यांतील सर्व निरनिराळ्या स्थितींमध्यें मी अगदीं निष्कलंक आहें, मीं सर्व सो-डलें आहे व वासनेचा बीमोड करून मी मोकळा झालों आहें. स्व:त-ला ओळखल्यावर मी आतां कोणाला ( गुरू ह्मणून ) दाखवून देऊं?

३५४. धर्मदान सर्व दानांहून श्रेष्ठ आहे. धर्मरुचीची गोडी सर्वांहून अजब आहे. धर्मांमध्यें होणारा आनंद सर्वांत अधिक आहे. वासनेचा बीमोड हाच सर्व दु:खांना शमविण्याला कारण आहे.

३५५. मनुष्य संसाराच्या पैलपार लक्ष न देईल तर त्या मूर्खा-चा विषयोपभोग नाश करतात. मूर्ख मनुष्य विषयोपभोगाच्या वास-नेनें जणू काय वैऱ्याप्रमाणें स्वत:चा नाश करून घेत असतो.

३५६. गवतानें शेताची नासाडी होते. रागानें मनुष्याचा नाश होतो; म्हणून वितृष्ण अशा मनुष्याला दिलेल्या दानाचें फळ मोठें असतें.

३५७. गवतानें शेताचा नाश होतो, द्वेषभावानें मनुष्याचा नाश होतो. ह्मणून ज्यांच्या मनांत द्वेषभाव नाहीं, अशांना दिलेल्या दानाचें फळ मोठें आहे.

३५८. गवतानें शेताचा नाश होतो, मोहानें मनुष्याचा नाश होतो. म्हणून निर्मोह अशा मनुष्याला दिलेल्या दानाचें फळ मोठें आहे.

३५९. गवतानें शेताचा नाश होतो, इच्छेनें मनुष्याचा नाश होतो. ह्मणून निरिच्छ अशा मनुष्याला दिलेल्या दानाचें फल मोठें आहे.

---

# पाद पंचविसावा.

## भिक्षु.

३६०. डोळ्याला, कानाला, नाकाला व जिभेला आवरणें चांगलें.

३६१. तसेंच शरीराला, तोंडाला व मनाला आवरणें चांगलें. सर्व गोष्टींमध्यें निग्रह असणें चांगलें. सर्व गोष्टींमधील निग्रहामुळें हे भिक्षो, सर्व दुःखांपासून मुक्त होतां येतें.

३६२. जो मनुष्य हाताला, पायाला, तोंडाला आवरून चांगला निग्रह ठेवतो, व एकाग्रतेनें स्वतःमध्यें आनंद पावून एकांतामध्यें समाधानवृत्तीनें असतो, त्यालाच भिक्षु म्हणतात.

३६३. जो भिक्षु तोंड आवरून शहाणपणानें शांतपणें बोलतो व धर्माचा अर्थ शिकवितो त्याचें तें भाषण मधुर समजावें.

३६४. जो धर्मामध्यें गढून त्यांत आनंद मानून घेतो व धर्मावर विचार करून तोच मनामध्यें आणीत रहातो, तो सद्धर्मापासून कधीं ढळत नाहीं.

३६५. जें कांहीं मिळालें असेल त्याबद्दल मनुष्यानें कधीं तुच्छता मानूं नये व कधीं दुसऱ्याचा हेवा करूं नये. दुसऱ्याचा हेवा करणाऱ्या भिक्षूला मनाची शांतता कधींही मिळत नाहीं.

३६६. ज्या भिक्षूला थोडें मिळालें असतां सुद्धां त्याबद्दल तुच्छता वाटत नाहीं, अशा शुद्धवर्तनाच्या निरालस भिक्षूची देवसुद्धां स्तुति करतात.

३६७. जो नामरूपांशीं ( मन व देह यांशीं ) स्वतःची ऐक्य-

ता करून घेत नाहीं व असद्वस्तूंविषयीं शोक करीत नाहीं, त्यालाच खरोखर भिक्षु म्हणावें.

३६८. जो भिक्षु सर्वांशीं मित्रत्वानें वागतो व बुद्धाच्या मतामध्यें सुखी असतो, त्याच्या सर्व वासना नाश पावून सुखी होऊन शांत अशा निर्वाण पदाला तो जाऊन पोहोंचतो.

३६९. हे भिक्षो, ही नाव रिकामी कर. ही रिकामी केल्यानें लवकर लवकर चालेल. राग व द्वेष दूर करून तुला निर्वाणाला पोहोंचतां येणार आहे.

३७०. पांच ( पाश ) तोडून त्यांना जिंकून त्यांच्यावर पगडा मिळीव. हे भिक्षो, या पांच पाशांपासून सुटलेल्याला ओघांतून बचावलेला समजतात.

३७१. हे भिक्षो, ध्यान ठेवून दुर्लक्ष करूं नकोस. ज्याच्यापासून क्षणिक सुख मिळतें अशाकडे आपले विचार लावूं नकोस. म्हणजे तुझ्या दुर्लक्षामुळें तुला नरकामध्यें लोखंडाचा गोळा गिळण्याचा प्रसंग येणार नाहीं व दुःख होत असतांना ' हें कष्टमय आहे, ' म्हणून रडण्याची पाळी येणार नाहीं.

३७२. ज्ञानावांचून ध्यान नाहीं व ध्यानावांचून ज्ञान नाहीं. ज्यानें या ज्ञानाला व ध्यानाला जवळ केलें आहे तो निर्वाणाच्या जवळ गेला समजावें.

३७३. आपल्या शून्य घरांत शिरून ज्या भिक्षूनें आपलें मन शांत केलें आहे, त्याला धर्म स्पष्ट कळूं लागून अमानुष आनंद होत असतो.

३७४. या शरीराच्या पंचतत्त्वांच्या उत्पत्तिनाशासंबधानें जसजसा तो विचार करतो तसतसा निर्वाणाची ओळख पटलेल्यांना होणारें सुख व होणारा आनंद त्याला होऊं लागतो.

३७५. इंद्रियांवर नजर ठेवून समाधानवृत्ति ठेवणें व धर्माप्रमाणें आचारण करूं लागणें, तसेंच ज्यांचें आचरण शुद्ध आहे व ज्यांना आळस ठाऊक नाहीं असे थोर मित्र जोडणें हें शहाण्या भिक्षूचें पहिलें काम आहे.

३७६. परोपकार करीत कर्तव्याला पूर्ण जागत राहिल्यानें आनंदसुखाचा त्याला पूर्ण लाभ होऊन त्याला आपल्या दुःखाचा शेवट करतां येतो.

३७७. अहो भिक्षूंनो, वासिका नांवाची लता ज्याप्रमाणें आपलीं सुकलेलीं फुलें खालीं गाळून टाकते, त्याप्रमाणें मनुष्यानें आपले राग व द्वेष गाळून टाकावे.

३७८. हे भिक्षो, शरीर, तोंड व मन शांत होऊन एकाग्रतेनें लक्षपूर्वक ज्यानें या जगाचें आमिष ओकून टाकलें आहे, त्यालाच शांत ह्मणतां येतें.

३७९. स्वतःच स्वतःला खडबडून उठवून स्वतःच स्वतःला ओळख. हे भिक्षो, स्वतःच्या योगानें स्वतःचें संरक्षण करून हुषार झाल्यानें तूं सुखी होशील.

३८०. कारण स्वतः स्वतःचा स्वामी असून आपणच आपले आधार आहों; ह्मणून वाणी ज्याप्रमाणें पाणीदार घोड्याला दाबांत ठेवतो, त्याप्रमाणें स्वतःच स्वतःला दाबांत ठेवावें.

३८१. आनंदपूर्ण अशा बुद्धांच्या तत्त्वांमध्यें सुख मानून घेणारा भिक्षु निर्वाणाला पोहोंचतो. वासनांचा बीमोड करण्यामध्येंच सुख आहे.

३८२. तरुणपणींच जो भिक्षु बुद्धाच्या तत्त्वाकडे मन लावतो, तो ढगांतून बाहेर पडलेल्या चंद्राप्रमाणें या जगाला प्रकाशमान करतो.

---

# पाद सव्विसावा.

## ब्राह्मण.

३८३. हे ब्राह्मणा, नेटानें ओघाला आळा वाल. वासनांना दूर कर. सर्व सृष्टीचा नाश तुला उमगला ह्मणजे असृष्ट अशा ( परमात्म्याची ) तुला ओळख पटेल.

३८४. आत्मनिग्रह व ध्यान यांच्या पैलपार जाऊन ज्ञान झालेल्या ब्राह्मणाचे सर्व पाश नाहींसे होतात.

३८५. ज्याला हा किंवा पैलपार कांहींच उरत नाहीं, अशा निर्बंध होऊन निर्भय झालेल्यालाच मी खरा ब्राह्मण समजतों.

३८६. विचारी, निर्दोष, स्थिर, कर्तव्यपर, निर्विकार असा होऊन ज्यानें उत्तम पद मिळविलें आहे, त्यालाच मी ब्राह्मण ह्मणतों.

३८७. सूर्य दिवसां प्रकाशतो, चंद्र रात्रीं प्रकाशतो, वीर आपल्या चिलखतामध्यें झळकतो, ब्राह्मण ध्यानामध्यें असतांना झळकतो; परंतु बुद्ध हा रात्रंदिवस आपल्या तेजानें झळकत असतो.

३८८. पापांना बाहेर केल्यानें मनुष्याला ब्राह्मण हें नांव येतें. शांतपणें वावरत राहिल्यानें त्याला श्रमण हें नांव येतें, व आपला मळ दूर केल्यानें त्याला प्रव्रजित ( संन्यासी ) हें नांव येतें.

३८९. कोणीही मनुष्यानें ब्राह्मणावर हात टाकूं नये; व ब्राह्मणानेंही कोणी आपल्यावर हात टाकला असतां त्यावर उलट तुटून पडूं नये. ब्राह्मणावर हात टाकणाराला धिक्कार असो; व अशावर तुटून पडणाऱ्या ब्राह्मणालाही त्याहून अधिक धिक्कार असो.

३९०. विषयसुखापासून मनाला आवरून धरणाऱ्या ब्राह्मणाला थोडाथोडका फायदा होत नाहीं. आपला घात करणाऱ्या वासना जितक्या जितक्या नाहींशा कराव्या तितकें तितकें सर्व दुःख नाहींसें होत जातें.

३९१. जो कायावाचामनानें कोणाला न दुखवितां या तिघांसंबंधानें खबरदारी घेतो, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

३९२ बुद्धानें शिकविलेला धर्म एकदां एखादा एखाद्यापासून शिकला म्हणजे अग्नीला भजणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणें त्यानें त्याला मोठ्या काळजीनें भजावें.

३९३. जटा वाढविल्यानें, थोर कुळाच्या योगानें किंवा केवळ जन्माच्या योगानें मनुष्य ब्राह्मण होत नाहीं. ज्याला सत्य व धर्म उमगला तोच धन्य असून त्यालाच ब्राह्मण समजावें.

३९४. मूर्खा, जटेचा काय उपयोग? अगर कातड्याच्या छाटीचा काय उपयोग? आंत तळमळ राहून उगीच बाहेरून स्वच्छ करीत बसण्यांत काय अर्थ आहे?

३९५. सुकून अंगावर शिरा दिसूं लागून जो मनुष्य धूळ चढलेल्या वस्त्रानिशीं एकटा अरण्यामध्यें ध्यान करीत पडतो, त्यालाच मी खरा ब्राह्मण समजतों.

३९६. त्याच्या जन्मामुळें किंवा त्याच्या आईमुळें मी त्याला ब्राह्मण समजत नाहीं. अशा प्रकारचा मनुष्य कदाचित् उद्धट किंवा लक्ष्मीचा लाल असण्याचा संभव आहे; परंतु जो मनुष्य गरीब असूनही सर्व संगापासून सुटला आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

३९७. सर्व बंधनें तोडून टाकून जो निर्बंध, निर्भय व निःसंग झाला आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

३९८. नाडी, पाश, बंध व त्यासंबंधी सर्व इतर बंधनें तोडून टाकून सर्व प्रतिबंधांतून मोकळा होऊन जो जागा झाला आहे, त्यालाच मी ब्राह्मण ह्मणतों.

३९९. जो कांहीं अपराध केला नसतांही निंदा, मार व कारागृह

सहन करतो व क्षमा हेंच ज्याचें बळ आहे व शक्ति हेंच ज्याचें सैन्य आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

४००. जो रागमुक्त, कर्तव्यपर, शीलवान व निरिच्छ असा असून ज्यानें आपल्यावर दाब ठेवून हा देह शेवटचा ह्मणून घेतला आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

४०१. कमळपत्रावरील पाण्याप्रमाणें किंवा सुईच्या टोंकावरील मोहरीप्रमाणें ज्याला विषयवासना चिकटत नाहींत, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

४०२. येथेंच आपल्या दुःखाचा शेवट ओळखून आपला भार खालीं करून जो निःसंग झाला आहे, त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

४०३. ज्याचें ज्ञान अगाध असून जो शहाणा आहे, ज्याला खरा खोटा मार्ग कळतो व ज्यानें आपलें साधन करून घेतलें आहे, त्याला मी बाह्मण म्हणतों.

४०४. सामान्य लोक त्याचप्रमाणें भिक्षू यांच्यापासून अलग राहून जो दारोदार भटकत नाहीं व ज्याच्या वासना फार कमी झाल्या आहेत त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४०५. जो कोणाला—मग तो दुर्बळ असो किंवा बळवान असो—दुखवीत नाहीं व जो कोणाला मारीत किंवा मारवीत नाहीं, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४०६. असहनशीलाशीं जो सहनशीलतेनें असतो, दोष काढीत रहाणाराशीं जो मऊ असतो व रागावणारावर जो राग करीत नाहीं त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४०७. सुईच्या टोंकावरून गळून पडणाऱ्या मोहरीप्रमाणें राग द्वेष, अभिमान व दंभ ज्यापासून गळून पडले आहेत, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४०८. कोणाला न दुखवितां उपदेशपर व मृदु असें सत्य भाषण जो करतो, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४०९. जी वस्तु आपल्याला दुसऱ्यानें दिली नाहीं ती लांब असो किंवा जवळ असो, लहान असो किंवा मोठी असो, बरी असो किंवा वाईट असो, जो घेत नाहीं, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१०. जो ह्या लोकासाठीं किंवा परलोकासाठीं आशा धरून नसतो व जो वासनेपासून सुटून निःसंग झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४११. ज्याला स्वार्थ न उरतां सत्य कळून हें कसें, तें कसें म्हणून शंका उरली नसते व जो निर्वाणाला पोहोंचला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१२. जो या जगामध्यें बऱ्या व वाईट अशा दोन्ही प्रकारच्या बंधनांना मागें सारून दुःखापासून, पापापासून व अशुद्धतेपासून मुक्त झाला आहे त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१३. जो चंद्राप्रमाणें निर्मळ असून शुद्ध, शांत व स्वच्छ झाला आहे व जो क्षणिक आनंदाच्या विकारांनीं खेद पावत नाहीं त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१४. जो हा चिखलवट रस्ता, हें दुस्तर जग आणि तत्संबधीं अहंकार ह्यांच्या पलीकडे जाऊन पैलपाराला जाऊन पोहोंचला आहे, जो विचारी, स्थिर, निःसंदेह, निःसंग व समाधानवृत्तीचा झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१५. या जगामध्यें सर्व वासनांना रजा देऊन, घरदार सोडून जो फिरत राहिला आहे व सर्व वाईट वासना ज्यापासून मावळल्या आहेत, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१६. जो सर्व इच्छा सोडून देऊन, घरदार सोडून भटकत

ाहिला आहे व ज्याच्यापासून लोभ नाहींसा झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१७. जो मनुष्यपाश त्याचप्रमाणें देवपाश बाजूला सारून सर्व पाशांपासून मुक्त झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१८. सुखात्मक व दुःखात्मक अशा सर्वांचा त्याग करून जो शांत झाला आहे, जो सर्व उपाधींपासून सुटला आहे, व ज्या वीरानें ं लोकांवर विजय मिळविला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

१९. प्राणिमात्रांचा सार्वत्रिक नाश व उत्पत्ति जो ओळखतो मुक्त होऊन जागा होऊन जो चांगल्या वाटेला लागला आहे, मी ब्राह्मण म्हणतों.

०. ज्याचा मार्ग देव, गंधर्व किंवा मनुष्य कोणालाच कळत ज्याच्या वासना नष्ट झाल्या आहेत व ज्यानें मान्यता मिळ- ाहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

२१. मागच्या, पुढच्या किंवा कशाही संबंधानें ज्याला म- रलें नाहीं व अकिंचन बनला असून जगावरचें ज्याचे प्रेम उ- ाहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

२२. शूर, थोर, वीर, मोठा शहाणा, जेता, विरक्त, गुण- न असा असून ज्याच्यावर ( ज्ञानाचा ) उजेड पडला आहे, त्या- मी ब्राह्मण म्हणतों.

४२३. ज्याला आपले पूर्वजन्म कळतात, स्वर्ग व नरक दिसतो, जन्माच्या शेवटाला येऊन पोहोंचला आहे, ज्याला पूर्ण ज्ञान झालें ाहे, जो विद्वान असून सर्व गुणांमध्यें ज्यानें परिपूर्णता मिळविली त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

